# या देशाचें होणार काय?

ता. १५-१०-१९५६ रोजी नागपूर कार्पोरेशनच्या वतीनें **डॉ.बाबासाहेब आंबेडकर** यांचा सत्कार करण्यात आला. सदर सत्कारास नागपूर शहरांतील सर्व नगरपिते व प्रतिष्ठित नागरिक हजर होतें. सत्कारासाठीं, खास मंडपहि तयार करण्यात आला होता.सदर समारंभ, संध्याकाळी ६ ते ८ च्या दरम्यान पार पडला. सभा मंडप गच्च भरून गेला होता. बाहेर रस्त्यावर दोही बाजूस प्रचंड गर्दी लोटली होती.

प्रथम नागपूर कार्पोरेशनचें मेयर (महापौर) यांनीं छापलि मानपत्र वाचून दाखविलें. नंतर त्यांनीं, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना पुष्पहार अर्पण करून त्यांचा सत्कार केला. या अंकांत पुढें मानपत्र समग्रपणें दिलेलें आहे.

## तुमची केवळ उदारता

मानपत्राच्या उत्तरादाखल, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं केलेलें भाषण दिलेलें आहे. डॉक्टरसाहेब म्हणाले:—

“नागपुर कार्पोरेशनचें मेयर, कार्पोरेटर्स, आणि उपस्थित नागरिकहो; माझा या नागपूर प्रांताशी विशेष संबंध आलेला नाहीं. माझा राजकीय संबधहि तितकासा नाहीं. या प्रातांसाठीं मी कांहीं विशेष असें केलेलें नाहीं. मी म्युनिसिपालिटीचा कधीं सभासद नव्हतो. (हंशा) त्यामुळें म्युनिसिपल कारभाराबाबत तुम्हास मी उपदेश करुं शकणार नाहीं. असें असतां तुम्ही मला हें जें मानपत्र देऊन सत्कार करीत आहांत, त्यात तुमची उदारताच आहे असें म्हटले पाहिजे.

तेव्हां या प्रसंगी तुम्हास कोणत्या विषयावर दोन शब्द सांगावेत याचा विचार मी करीत आहे.हा विचार करतांना मला असें वाटते कीं, म्युनिसिपल कारभार हा कांहीं अशी भिन्न असला तरी, म्युनिसिपालटीचा कारभार व देशाचा कारभार यांत पुष्कळ साम्य आहे. म्हणून, या प्रसंगी आपल्या देशाच्या कारभारासंबंधी तुम्हास मी दोन शब्द सांगूं इच्छितो.

## ‘दिसायला’ एक ‘करायला’ दुसरेंच

आपल्या देशाची राज्य घटना अम्मलांत येऊन ५ वर्षे झाली. बाह्यांतकारी तरी असें दिसेंल कीं, आपली राज्ययंत्रणा व इंग्लंडमधील राज्ययंत्रण, कांही भाग सोडला तर बहुतांशी सारखीच आहे. तिकडे प्रौढ मतदान, पद्धतीनें निवडणुका होतात; आपल्या देशांतही तशाच निवडणुका होतात. त्या देशांत पार्लमेंट आहे; आपल्या देशांतही पार्लमेंट आहे. त्या देशांत पार्लमेंटांत बहुमतानें निर्णय घेतात; आपल्या देशांतील पार्लमेंटमध्येंही बहुमतानें निर्णय घेतात. असें असले तरी त्या देशांतील राज्य कारभारांत व आपल्या देशांतील राज्य कारभारांत, एक विलक्षण फरक दिसून येतो. तो हा कीं, आपल्या देशाच्या कारभारांत ‘दिसायला’ एक व ‘करायला’ दुसरें असें कांहीं निराळेंच चित्र दिसतें.

## भयानक चित्र !

तुम्ही या गोष्टीबाबत, आपल्या देशाची राज्य घटना कशी काम करते, व ती कशी राबविली जातें याचा विचार करतां कीं नाहीं मला माहित नाहीं. लोकांनी आतां राज्य कारभाराबाबात व राज्यघटनेबाबत जागरूक राहिलें पाहिजे. मी स्वतः या गोष्टीचा नित्य विचार करतो. कारण या राज्य घटनेचा मी आद्य कर्ता आहे. आणि विचार करतांना शेवटी या देशाचें होणार तरी काय असें भयानक चित्र माझ्या डोळ्यापुढें उभे रहाते.

## बॅट सोडून तंबूत न जाणारा खेळाडू

मला निवडणुकीची आतां मोठी आवड नाहीं. राजकारणाचा उपभोग घेऊन मी पाहिला आहे. जातीपातीच्या भेदामुळें या देशांतील राजकारण आतां कॉंग्रेस राजवटीत असें बनलें आहे कीं, अल्पसंख्य असलेल्या जमातींना जीवनासाठीं कांहीं तरुणोपाय राहिलेला नाहीं. तरीपण मी कांहीं राजकारण सोडणार नाहीं. मी माझें राजकारण चालूंच ठेवणार आहे. कारण, मी कांही तसा बॅट सोडून तंबूत जाऊन बसणारा खेळाडू नाहीं (हंशा व टाळ्या)

## उमेद्वार निवडण्याचा हक्क कोणाचा ?

मी तुम्हांला, आतांच इंग्लंडमधील यंत्रणा व आपल्या देशांतील यंत्रणा याबाबत सांगत होतो. या दोन देशातील राज्य यंत्रणेंत मुख्य फरक आहे तो हा कीं, इंग्लंडमधील मतदार संघांतील मतदारच आपल्या उमेदवाराची निवड करतात. त्यांच्या मतदार संघांतील जे मतदार असतात, त्यांना त्यांच्या मधील कोणता उमेदवार कसा आहे, त्याचें शिक्षण काय आहे, त्याचें चारित्र्य काय आहे,त्याची समाजसेवेची वृत्ती काय आहे, याची चांगली कल्पना असते.

[पान १४ पहा]

— आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक —

# लोकशाहीवरील घाला!

( पान १३ वरून )

व त्यांनुसार तेथील मतदारच आपला उमेदवार कोण असावा, हें ठरवितात.

### रस्त्यावरील 'खांबा' ला मत द्यायचें ?

आपल्या देशांत या बाबतची तऱ्हा कांहीं निराळीच आहे. कोणत्या मतदार संघांत कोण उमेदवार उभा करावा याचें स्वातंत्र्य अजूनहि मतदारांना नाहीं. आज कॉंग्रेसची निवडणुकीबाबतची जी पद्धति चालू आहे त्यावरून हें तुम्हास हें दिसून येईल कीं, कोणत्या मतदार संघांत कोणा माणसास उभें करावें हें **सर्व दिल्लीला कॉंग्रेस हायकमांड ठरविते.** त्याची वास्तपुस्त मतदार संघांतील मतदारांना कांहींच नसतें. कॉंग्रेस हाय कमांडनें उभा केलेला उमेदवार कसा आहे, त्याचें चारित्र्य काय, त्यानें कांहीं काळाबाजार, अफरातफर केली आहे काय, तो समाजाच्या कल्याणाची बाजू घेऊन पार्लमेन्ट असेंब्लीमध्यें झगडतो काय याच्याशी कॉंग्रेस हायकमांडनें मतदारांना कोणतेंच कर्तव्य ठेवलेलें नाहीं. आम्ही सांगू त्याला तुम्ही मत दिलेंच पाहिजे असा कॉंग्रेस हायकमांडचा दंडक आहे. असें इंग्रजी भाषेंत म्हणतात कीं, जर रस्त्यावरील खांबाला (**Lamp Post**) मत द्या असें सांगितलें तरी देखील, कॉंग्रेस हायकमांडच्या हुकुमाप्रमाणें तुम्ही रस्त्यावरील खांबालासुद्धां मत दिलें पाहिजे.कॉंग्रेस हायकमांडचा असा दावा आहे; व तो दावा आचरणांतही आणला जातो. आणि याला हे कॉंग्रेसचें लोक 'लोकशाही' म्हणतात. यास लोकशाही कोण म्हणेल? लोकशाहीवर हा शुद्ध घाला आहे.

### कॉंग्रेसी बायकांचें राजकरण

सध्यां कॉंग्रेसच्या राजकारणांत स्त्रीयांच्या सभासदांची संख्या वाढविण्यांत येत आहे. स्त्रीयांच्या या कांग्रेसी राजकारणाचा अर्थ कांहीं समजत नाहीं. या बायांनीं दिवसभर पार्लमेन्ट—असेंब्लीमध्यें जा व या चें आणि संध्याकाळी परत आल्यावर नवऱ्याला विचारावयाचें मी " अहो, पार्लमेन्टतून आले आले आहे. झाली आहे कीं नाहीं घरांतील सर्व व्यवस्था?" या बाया पार्लमेंटांत जायच्या आणि त्यांची मुलं कोणी सांभाळयची ? एक मूल रडतं आहे, दुसऱ्याला शेंबूड आहे, तिसरे भलत्या ठिकाणीं गेले आहे, अशा मुलांची व्यवस्था मग ठेवणार कोण ? बरें, पार्लमेंटमध्यें जाऊन या बाया करतात तरी काय ? त्या बाबत मला तर सांगण्याची शरम वाटते.

### बहकलेल्या स्त्रिया

त्यांच्या बाबत सांगावें अशा माझा विचार नव्हता, पण सांगतोच. त्यांच्या अंगची नीतिमत्ता तर साफ साफ निघून चालली आहे. माझ्याकडे कांहीं पत्रे आलेली आहेत. त्या पत्रातील मजकूर तर पंतप्रधाना बाबतचा आहे. अशी पत्र लिहिणारी बाई महाराष्ट्रीयन आहे ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे. तिनें पत्रामध्यें तर नेहरूंचा उल्लेख करून आमचे 'ते' व आमचे 'हे' असें करतील नि तसें करतील अशा प्रकारे लिहिलें आहे. मला प्रथम वाटलें, पंत प्रधानास बदनाम करण्या साठीं तिनें तसें पत्र लिहिलें असेल. परंतु, त्या पत्राची जाणीव मी पंत प्रधानाला दिली तर ते म्हणाले, अशी शेंकडों पत्रें येतात. याला काय म्हणावें ? या पार्लमेंटमध्यें जाणाऱ्या स्त्रीया अशा बहकलेल्या असतील, त्यांना तेथें कॉंग्रेसनें जाऊं देण्याचें काय कारण आहे ?

### ही हुकूमशाही नव्हे तर काय ?

कॉंग्रेसच्या राजकारणांतील आतां दुसरें एक उदाहरण पहा. आमच्या मुंबई राज्यांतील **मोरारजी भाई देसाई** म्हणतातः-" मला एकमतानें निवडलें पाहिजे; आणि एकदा निवडल्यावर माझ्या ( मोरारजींच्या ) कारभारांत **कोणीही** ढवळा ढवळ करतां कामा नये. " आतां या प्रकारास काय म्हणावें तें तुम्ही पहा. उद्यां समजा, मोराजना निवडलें आणि त्यांनी त्यांच्या मंत्रिमंडळांत त्यांचें एकादे कुत्रें नेमले तरी देखील त्यामध्यें कोणी ढवळाढवळ करूं नये असें सांगण्याचा त्यांचा मतलब आहे. ज्या इंग्लंडची राज्य पद्धति आपल्या राज्य घटनेंमध्यें स्वीकारण्यात आली आहे, तेथें हें कार्य कसें केलें जातें? त्या ठिकाणी सत्तेवर बसलेल्या पक्षांतील पहिल्या रांकेत पार्लमेंटमध्यें बसलेलें जे सभासद असतात, त्यांच्या सर्वांच्या अनुमतीनें या गोष्टी ठरविल्या जातात. एका माणसाला एकदा कां निवडलें म्हणजे दुसऱ्या कोणीही ढवळाढवळ करूं नये असें तत्व तेथें कोणीही सांगत नाहीं; व तसें सांगितलें तर चालणारहि नाहीं. पण

( पान १५ पहा )

# ही हुकूमशाहीच

(पान १४ वरुन)

**आमच्या देशांत, मोरारजीभाई सारखे म्हणतात, कीं, मी म्हणेन तेंच झालें पाहिजे. मग यामध्यें आणि हुकूम शाहीमध्यें फरक काय आहे ! जर्मनीमध्यें हिटलरची हुकूमशाही होती. त्याच्या एकक्याच्या तंत्राप्रमाणें त्यास राज्य कारभार हवा होता. त्यापेक्षां मोरारजी कांहीं निराळें सांगताहेत काय? हा अजब प्रकार या देशांतच व कॉंग्रेस पक्षा मार्फत चालूं शकतो. त्याचें पुढें काय घोर परिणाम या देशाला भागावे लागतील याची कल्पना पुष्कळांना नाहीं.**

## सुएझ कॅनॉल बाबतचें धोरण

कॉंग्रेसच्या चालू राजवटीतील, सुएझ कॅनॉल बाबतचें नेहरूंचें धोरण घ्या. **नासेरनें** त्या कॅनॉलचे राष्ट्रीयकरण केलें आहे. नेहरू त्यास पाठिंबा देऊन एक प्रकारे चंचल प्रदर्शनच करीत आहेत. या बाबतीत मुख्य प्रश्न आहे तो हा कीं, जगाचा व्यापार उदीम ज्या कॅनॉलच्या जलमार्गाच्या रहदारीवर अवलंबून आहे तो कॅनॉल एकाच राष्ट्राच्या आखत्यारी खालीं असला पाहिजे कीं आंतरराष्ट्रीय नियंत्रणाखाली असला पाहिजे ! भारताचा फार मोठा व्यापार या कॅनॉलच्या मार्गानें होतो. आज **नासेर** व **इजिप्त** सरकार भारतावरोबर मैत्रीच्या नात्यानें आहे. सदा सर्वकाळ इजिप्त मैत्रिनेंच भारताशीं राहील असें कोण म्हणू शकेल ? समजा उद्यां, इजिप्तचें सरकार भारताशीं मैत्रीनें राहिलें नाहीं तर काय होईल ? जर भारत एकादे प्रसंगीं युद्धांत ओढला गेला तर कोणता प्रसंग ओढवेल ? इजित सरकारनें कॅनॉलमधून भारताकडे येणारा शस्त्रपुरवठा थोपवून धरला, व पाकिस्तानला अनुकूल धोरण इजिप्तनें अंगिकारलें तर या देशाचा पराभव होण्यास कितीसा वेळ लागेल ? सुएझ बाबतचें कॉंग्रेस सरकारचें धोरण असें हें शहाणपणाचें नाहीं. ते धोकेबाज आहे. नेहरूनाच कांहीं या बाबत बुद्धि आहे, व इतर नागरिकांना नाहीं, असें समजून नेहरूनी चालविलेलें धोरण हें बंद झाले पाहिजे. कॉंग्रेस राज्याचा एकेक मामला तो असा आहे.

## बुवा बाजीचें ढोंग.

आतां, आणखी दुसरे एक उदाहरण भूदानवाले विनोबा भाव्यांचें घ्या ! हे गृहस्थ ठिकठिकाणीं हिंडून भूदानासाठीं जमिनी गोळा करीत आहेत. एवढें जर आहे, तर लोक विनोबा भावे यानाच भारताचा पंत प्रधान कां करीत नाहींत ? विनोबा भावे यांनीं पंत प्रधान व्हावे व देशांतील जमीनींचा प्रश्न सोडवावा. नाहींतर उगीच हा चोंबडेपणा कशाला हवा ? हें ना धड कॉंग्रेस सरकारचें काम ना धड भाव्याचे काम असें होउन बसलें आहे. या देशांतील बुवाबाजीचे फार मोठें खूळ आहे. एकाद्या माणसानें कांहीं 'विचित्र' केलें तर तो साधुपुरुष बनतो. त्यानें जर फाटके कपडे घातले, गटारांतील तो पाणी प्याला अगर लंगोटी लावली, असें कांहीं तरी विचित्र केलें कीं, या देशांत त्या माणसाला साधु पुरुष मानतात. पण एकाद्यानें स्वच्छ कपड वापरलें, स्वच्छ पाणी पाहिजे असें म्हटले, कीं मोठा 'मिजासखोर' आहे असें म्हणतात. हा देश अशा कांहीं विक्षिप्त विचार सरणीत सांपडलेला आहे. त्यासाठीं आतां सर्वांनीं जागरुक राहून हे प्रकार बंद केले पाहिजेत.

## देशाचा नाश होईल ?

"आपण नवीन घटना घेतली आहे. आपल्याला या घटना पद्धतीचा अनुभव नाहीं. ती या देशांत अत्यंत दक्षतेनें राबविली नाहीं तर या देशाचा नाश होईल. केवळ पांढऱ्या टोप्यांनी काम चालणार नाहीं. सगळ्या राष्ट्रानें बसून राजकारणाचा अभ्यास केला पाहिजे. एकट्या जवाहरलालनांच बुद्धि दिलेली आहे, असेंहि नाहीं. जवाहरलालपेक्षां बुद्धिमान लोक अनेक आहेत. मी मंत्रीमंडळांत असतांना आठवड्यांतून एक वेळ कॅबिनेट भरत असे. तेथें मी त्यांना चांगले तोलून पाहिलें आहे. ते केवळ पोकळ भोपळ्याप्रमाणें आहेत. या पलिकडे कांहीं नाहीं. 'पाहिजे मुलीला सुंदर नवरा' असेंच म्हणावयाचें असेल, तर मात्र ठीक आहे. पण नेत्याला बुद्धि पाहिजे. कणखरपणा पाहिजे. तो देशाचें कार्य करणारा हवा असेल तर असें लोक सांपडतील. पण तुम्हाला तोच हवा ! विषयांतर झालें आणि कांहींना ते अरुचिकर वाटलें तर त्यांनीं क्षमा करावी. पण लोकांना तुम्ही मूर्ख आहांत हे स्पष्टपणें कुणीतरी सांगायलाच हवें. तुम्ही कदाचित् मला मतें देणार नाहीं. पण त्याची मला फिकीर नाहीं.

(पान १७ पहा)

# कार्पोरेशनचें मानपत्र !

## भारतीय पददलित जनतेच्या मूक भावनांची साकारमूर्ति —

## सन्माननीय डॉ. बाबासाहेब आंबेडकर

एम्. ए. पीएच्. डी., डी. एस. सी., बार-ॲट्-लॉ.,

आपल्या सारख्या समाजसुधारक, तत्वज्ञ व विधिज्ञ पंडिताचें स्वागत करण्याची संधी नागपूरच्या जनतेस लाभली याबद्दल आम्हांला परम हर्ष होत आहे.

तसें पाहिलें तर नागपूर शहराशीं आपल्या जीवनाचा अत्यंत घनिष्ठ संबंध आला आहे. महानपरिश्रमानें विद्यासंपन्न झाल्यानंतर याच नगरींत आपण १९३० सालीं दलित जनता परिषद भरवून, देशांतील दलित समाजाला मार्गदर्शन केलें व आपल्या सामाजिक आणि राजकीय जीवनाला प्रारंभ केला आहे. याच नगरींत १९४२ सालीं अखिल भारतीय शेडयुल्ड कास्ट्स फेडरेशनला जन्म देऊन पददलित समाजाच्या राजकीय आकांक्षांचा निनाद आपण साऱ्या भारतांत प्रथम दुमदुमविला आहे. आणि आज याच नगरींत आपल्या उत्तर जीवनांत बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन, आपण आपल्या नवीन जीवनाला प्रारंभ करीत आहांत.

आपल्या अष्टपैलू जीवनाकडे दृष्टिक्षेप केल्यास असें दिसून येईल कीं आपला पिंड प्रगाढ पंडिताचा असला तरी तो नुसत्या तार्किक विवेचनांतच गुरफटून न ठेवतां प्रत्यक्ष कर्तव्यसृष्टींत उतरविला आहे. शतकानुशतकें धार्मिक, सामाजिक व आर्थिक अशा सर्वच बाबतींत पिळवटून निघालेल्या अस्पृश्य समाजाच्या मूक करुण किंकाळ्यांनीं आपल्या हृदयाला पाझर फुटून आपण त्यांच्या सेवेचें असिधाराव्रत स्वीकारलें. महाडच्या "चवदार तळ्याचा सत्याग्रह" नाशिक येथील "काळाराम मंदिर प्रवेश सत्याग्रह" या सारख्या किती तरी सत्वपरीक्षांनीं आपलें जीवन अधिकच उज्वल केलें आहे.

'वन्ही तो चेतवा वारे, चेतविताची चेततो; केल्यानें होत आहे रे आधी केलेंचि पाहिजे' या समर्थ रामदासांच्या उक्तिप्रमाणें दलित समाजाचा आत्मा आपल्या अविरत परिश्रमानें जागृत झाला आणि त्यानें आपल्या राजकीय व सामाजिक हक्कासाठीं आपल्या नेतृत्वाखालीं लढा आरंभिला. त्याचाच परिपाक लंडन शहरीं भरलेल्या गोलमेज परिषदेंत दलित समाजाचें एकमेव नेते म्हणून आपली निवड होण्यांत झाला. गोलमेज परिषदेंतील आपली कामगिरी स्पृहणीय आहे.

आपल्या अंगच्या अशा असामान्य गुणांमुळेंच १९४२ सालीं त्या वेळच्या भारत सरकारनें मजूर मंत्री म्हणून आपली नियुक्ति केली आणि आपण ती जबाबदारी उत्कृष्टपणें सांभाळली व श्रमजीवी वर्गाची आपण अपरिमित सेवा केली.

पारतंत्र्याच्या काळोख्या रात्रीनंतर भारतीय क्षितीजावर स्वातंत्र्य सूर्याचा उदय झाला. या स्वातंत्र्य रविचा प्रकाश प्रत्येक भारतीयाच्या जीवनांत पडून त्याचें जीवन तेजोमय झालें पाहिजे म्हणून भारतीय सार्वभौम गण राज्याची घटना तयार करण्याचे ठरले. आपण घटना समितीवर निवडून आलांत आणि या

(पान १७ पहा)

( पान १६ वरून )

समितीचे अध्यक्ष पदीं विराजमान झालांत. समता, स्वातंत्र्य व बंधुभाव या त्रयींवर उभारल्या गेलल्या सामाजिक, राजकीय व आर्थिक न्याय्य हक्काच्या राष्ट्रीय सनदेचा जन्म आपल्या नेतृत्वाखालीं झाला. भारतीय घटनेचें शिल्पकार म्हणून आपणास कलियुगांतील ' स्मृतीकार मनू ' अशी सार्थ पदवी आपणास भारतीयांनीं दिली. भारतीय राज्य—घटना आपली स्मृती भारत वर्षांत चिरकाल टीकवील अशी आम्हाला खात्री आहे. तसेंच, स्वतंत्र भारत सरकारचें विधिमंत्री असतांना आपण हिंदुकोड बिलाच्या योगानें भारतीय स्त्री जातीच्या हक्काचें जे समर्थन केले, त्याला दुसरी तोड नाहीं. युगानुयुगें भारतीय स्त्री जात आपल्या सेवेबद्दल ऋणी राहील

शिक्षणाशिवाय जीवन पवित्र व तेजस्वी होत नाहीं हें ओळखून बहुजन समाजाच्या जीवनांत त्याचा प्रसार करण्याकरितां अनेक अडचणींना तोंड देऊन आपण मुंबई येथें पीपल्स एज्युकेशन सोसायटी नांवाची संस्था स्थापन केली व तिच्या विद्यमानें मुंबई येथें सिद्धार्थ महाविद्यालय व औरंगाबाद येथें मिलींद महाविद्यालय काढून दलित समाजाकरितां उच्च शिक्षणाचें महाद्वार मुक्त केलें आहे. बाबासाहेब, आपलें सारें जीवन बहुजनहिताय व बहुजन सुखायच खर्च झालें आहे. पददलिताच्या उन्नतीशिवाय राष्ट्र उन्नत होणार नाहीं या मताविषयीं दुमत होऊं शकणार नाहीं.

आजच्या अशांत युगांत शांती व अहिंसेचेच तत्व जगाला आशेचा किरण दाखवून पथप्रदर्शन करील अशी प्रत्येकाची धारणा आहे. शांती व अहिंसेचा भारतांत व भारता बाहेर अडीच हजार वर्षांपूर्वी प्रचार केलेल्या सम्राट अशोकाच्या अशोक चक्राला आपल्या राष्ट्रीय ध्वजावर स्थान प्राप्त झालें आहे. त्याच महान सम्राटानें स्वीकारलेल्या बुद्ध धर्माची दीक्षा आपण घेत आहांत भारताच्या शांति व अहिंसा नीतीचा प्रकाश आपण साऱ्या विश्वांत प्रसारित कराल अशी आम्हांस खात्री आहे. परमेश्वर आपणांस दीर्घायुरारोग्य प्रदान करो.

विनीत,
नागपूर महापौर व सदस्य,
दि० १५-१०-५६
नागपूर महानगरपालिका

-x०x-

( पान १५ वरुन )

शेवटी स्थायी समितीचें चेअरमन श्री. **चौधरी** यांनीं आभार मानले. आभार मानतांना श्री. चौधरी म्हणाले: " कॉंग्रेसच्या राजकारणांत, पडद्यामागें कस कशा गोष्टी चालतात, व कॉंग्रेस राज्य कसें हुकूमशाहीकडे चालले आहे, याची खात्री आम्हास डॉ. **बाबासाहेब आंबेडकरांच्या** भाषणावरून पटली आहे. त्यासाठीं, आपण सर्वांनी जागरुक राहिले पाहिजे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना देशकार्य करण्यास दीर्घायु लाभो अशी मी कार्पोरेशनच्या वतीनें प्राथना करुन आभार प्रदर्शन संपवितो. "

—०—

## नागपूरच्या बौद्धजनहो!

नागपुरीच्या
बौद्ध जनहो !
करुनि आमुचें
प्रचंड स्वागत
तुम्ही आम्हा-
केले उपकृत
नागपुरीच्या
बौद्ध जनहो ॥१॥
ओळखुनी तुम्ही
आपुली ऐतिहासिक
उज्वल परंपरा
घेतला मान पहिला
बाबासह धर्मदिक्षेचा
नागपुरीच्या
बौद्ध जनहो ! ॥२॥
लाखोंना करुनि
आवाहन
सत्धर्माचा
नंदादीप लेवुनी
केली भूमी
सुमंगल आपुली
नागपुरीच्या
बौद्ध जनहो ॥३॥
कधींन न होई
विस्मरण तुमच्या
प्रचंड उत्साहाचे
आणि नाहीं
कधीच होईन
विस्मरण त्या
तुमच्या सहृदयतेचे
नागपुरीच्या
बौद्ध जनहो ॥४॥
धर्म तीर्थ क्षेत्र
बनली आतां भूमी
तुमच्या भाग्यशाली
भ वि ष्य का ळीं
को ट्या व धि ची
प्रतिवर्षी होईल
गर्दी तीर्थयात्रेसाठीं
नागपुरीच्या
बौद्ध जनहो ! ॥५॥

—दिनेश
माटुंगा, मुंबई

# मला धर्म प्यारा आहे

मध्य प्रदेश दलित फेडरेशन शाखेच्या वतीनें, ता. १५।१०।५६ रोजीं सायंकाळीं ५॥ वाजतां, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या सन्मानार्थ, नागपूर मधील **श्याम हॉटेल** मध्यें छोटीशी **चहा पार्टी** देण्यांत आली होती. या समारंभास सौ. माईसाहेब होत्या. शिवाय, दलित फेडरेशनचे पदाधिकारी व कार्यकर्त्यां-पैकीं **बॅ. खोबरागडे** श्री. **दादासाहेब गायकवाड**, श्री. **आवडे बाबू** श्री. मेश्राम, श्री. कुंभारे **श्री.- गोंडाणे श्री. जी. टी. परमार (गुजराथ)** श्री. **ए. जी. पवार** श्री. **आर. डी. भंडारे** व श्री. **बी. सी. कांबळे** वगैरे हजर होते.

प्रथम श्री. आवडेबाबू यांनी, डॉ.- बाबासाहेब आंबेडकरानी हजर राहून उपकृत केल्याबद्दल डॉक्टर साहेबांचे आभार मानले. नंतर, दलित फेडरेशनच्या कार्यकर्त्यांना उद्देशून मार्गदर्शन-पर दोन शब्द सांगावेत म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना विनंति केली.

### धर्म अधिक प्यारा

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं या विनंतिस मान देऊन, कार्यकर्त्यांना उपदेशपर असें भाषण हिंदींत केलें. ते म्हणाले:—

"या ठिकाणी मला भाषण करावें लागेल याची कांहीं कल्पना नव्हती. तशी कल्पना असती तर माझे विचार संकलित करून मांडणे सोईचे झालें असते.

एकंदर मला असें दिसतें कीं, तुम्हाला राजकारण फार प्यारे आहे. कोणत्याहि गोष्टीपेक्षां राजकारणाची तुम्हाला अधीक आवड दिसतें. माझें तसें नाहीं. मला धर्म जास्त प्यारा आहे; आणि त्यासाठीच मी माझी शक्ति वेंचणार आहे.

### आदर्श विरोध

तुम्हाला कांहीं खास अधिकार मिळवून देण्यासाठीं मी आजवर खूप प्रयत्न केलें. ते अधिकार मिळवून देण्यासाठीं मी गांधीशी झगडा केला; कॉंग्रेसशी सामना दिला. त्यावेळी प्रथमतःत्यावेळच्या मुंबई असेंब्लींत १५।१६ आमचे लोक निवडून आले. असेंब्लींत सरकार विरोधी पक्ष म्हणून आम्ही काम केलें, तें एवढें वाखाणण्या सारखें होतें कीं, असेंब्ली मधील आदर्श विरोध म्हणून त्यावेळचे मुख्य मंत्री श्री. खेर यांनी उद्‌गार काढावें लागले.

त्या काळा नंतर लढाई आली. लढाईच्या काळांत कांहीं विशेष करतां आले नाहीं.

### राखीव जागा उपयोग शून्य

आपला देश स्वतंत्र झाल्यावर राज्य घटना घडविली जातेवेळीं आपल्या राखीव अधिकाराचा विचार झाला. कॉंग्रेस वाल्याना राखीव जागां-करितां सवता मतदार संघ मान्य नव्हता. तेव्हां जे वारे वाहत होतें तें संयुक्त मतदार संघाचें होते. याचाहि प्रयोग करून पहावा, असें पुष्कळांना वाटलें. चोराची लंगोटी देखील सोडू नये म्हणतात. त्या प्रमाणें राखीव जागा सोडून न देता त्यांचा संयुक्त मतदार संघानें प्रयोग करावा असें वाटले. पण आतां असा अनुभव येऊन चुकला आहे कीं, कॉंग्रेसच्या तिकीटावर राखिव जागेवर जी माणसे येतात ती आपली तोंडें बंद करुन बसतात. अशा तऱ्हेनें संयुक्त मतदार संघामुळें जर गंधे लोक निवडून येत असतील तर निवडणुकांचा व जागांचा उपयोग तरी काय? त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं हें अनुभवानें आतां सिद्ध झाल आहे.

### समाजाचें ऐक्य महत्वाचें

राखीव जागा नकोत, म्हणून फेडरेशननें ठराव केला आहे. त्या ठरावास मी चिकटून राहू इच्छितो. त्या ठरावापासून ढळण्याची माझी इच्छा नाहीं. राखीव जागा १० वर्षासाठीं आहेत. त्या जागा आतां या निवडणुकांनंतर रहाणार नाहींत. आपल्या समाजाचें **ऐक्य** ही कोणत्याहि गोष्टी पेक्षां अधीक महत्वाची गोष्ट आहे. या राखीव जागा गौण आहेत.

### आपली तटबंदी

आपल्या आजपर्यंतच्या फेडरेशनच्या चळवळीनें स्वाभिमान अवश्य

(पान१९ पहा)

(पान १२ वरून)

**कल्याणं, मध्य कल्याणं, पर्यासान कल्याणं** ' त्या वेळच्या परिस्थिती प्रमाणें **तथागतानें** आपल्या धर्माच्या प्रचाराचा मार्ग तयार केला. आतां आपल्यालाही यंत्रणा तयार करावी लागेल. म्हणून समारंभानंतर दरेकानें दरेकाला दीक्षा द्यावी. दरेक बौद्ध माणसाला दीक्षा देण्याचा अधिकार आहे असें मी जाहीर करतो."

[टाळ्यांचा कडकडाट]

अशा तऱ्हेनें दोन तास चाललेलें भाषण डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं संपविलें.

—×०×—

# दुःख जाणणारे शोधूं!

( पान १८ वरुन )

निर्माण केला. ही गोष्ट फेडरेशनला भूषणावह आहे. त्यामुळें संघटना झाली. तथापि, त्यामुळें एक प्रकारची तटबंदीहि निर्माण झाली. दुसरे लोक आम्हाला मत देत नाहींत, व आपण लोक त्यांना मत देत नाहीं ही एक प्रकारची तटबंदीच होय. दुर्दैवाने आपली लोकसंख्या कमी आहे. आपण केवळ अल्प संख्यांक आहोत. अशा परिस्थितींत, फेडरेशन आहे त्या स्थितीत ठेवणें कठीण आहे.

**आमचें दुःख जाणणारे कोण ?**

**यासाठीं, इतर समाजातील आमचें दुःख जाणणारे कोण आहेत हे पाहिलें पाहिजे. अशा सर्वांना आपण एकत्रित करून त्यांच्यासह जाण्याची आपली सिद्धता पाहिजे. अशा लोकांना एकत्रित करण्याचा मी प्रयत्न करीत आहे. तो प्रयत्न यशस्वी झाल्यास आपल्याला नवीन पक्ष स्थापवा लागेल; व त्या पक्षांत आपल्या शिवाय इतरांनाहि दार मोकळे राहील.**

**राजकारण धीराचें आहे,**

तुमच्यातच नव्हे तर या देशांत एक विचित्र विकृति दिसून येतें. ती ही कीं, आज झाड लावले कीं, त्यास दुसऱ्या दिवशी फळ खावयास आले पाहिजे. राजकारणांत अशी अपेक्षा धरणें चूक आहे.

इंग्लंडमधील राजकारण घ्या. तेथील ब्रिटिश **मजूर पक्षाचा** इतिहास काय सांगतो ? १९०० साली त्यांचे फक्त दोन लोक पार्लमेंटांत निवडून आले. १९०६ साली त्यांना सुमारे १४ जागा मिळाल्या. १९२४ पर्यंत त्यांना विशेष यश नव्हते. त्या साली मात्र त्यांचे जवळ जवळ १२५ लोक निवडून तो खरा विरोधी पक्ष बनला.

अशा तऱ्हेनें राजकारण दमाचा धीराचा खेळ आहे. ज्यांना दम धीर नाहीं, त्यांना राजकारण करतां यावयाचे नाहीं.

**आतां इतर समाजाच्या सर्व लोकांबरोबर काम करावयास तुम्ही शिकलें पाहिजे.**

**तुमच्यांत तुम्ही फूट ठेवून चालणार नाहीं. माझ्या दबदब्यामुळें अजून कांहीं वेडेवाकडे घडत नाहीं. पण मी तुम्हांसाठीं कोठपर्यंत रहाणार ?**

आतां उमेदवार निवडण्याचें काम लोकानीच केलें पाहिजे लोकामध्यें तुम्ही काम केले पाहिजे. त्यांच्या अडीअडचणीना तुमच्या ताकदी प्रमाणें वाचा फोडली पाहिजे. त्यांच्या सुख दुःखाशी समरस होण्याचा तुम्ही प्रयत्न केला पाहिजे.

मी भंडाऱ्यातील निवडणुकींमध्यें पडलो त्याचे मला कधीं वाईट वाटलें नाहीं. तरी त्या निवडणुकींत मला बरीच मते पडले. आपली मतें सोडली तर इतर समाजानें देखील मला मते दिलेली आहेत. ही गोष्ट माझ्या समाधानाची आहे. मी पडलो कीं निवडून आलो याचा प्रश्न मी विचारांत घेत नाहीं. तुम्हीही अशाच प्रकारे कर्तबगार होण्याचा प्रयत्न करून, इतर समाजास देखील तुम्हास मतें द्यावीत असें वाटले पाहिजे. माझी खात्री आहे कीं या गोष्टींचा विचार करून तुम्ही तुमचे राजकीय जीवन कार्यक्रम चालवाल यापेक्षां आतां अधीक कांहीं मी सांगत नाहीं."

शेवटी श्री. आवडे यांनीं डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे हार्दिक आभार मानले व बाबासाहेबांच्या उपदेशाप्रमाणें आम्ही वागूं असें आश्वासन त्यांनीं व्यक्त केलें व चहा पार्टी समाप्त झाली.

—×○×—

# पू. चंद्रमणींचा सत्कार!

अखिल भारतीय बौद्ध महासभेतर्फे **महाथेरो पूज्य चंद्रमणी** यांचे भव्य स्वागत मुंबईतील भोईवाडा पोलीस स्टेशन समोरील मैदानावर दिनांक २३-१०-५६ रोजीं करण्यांत आले. पददलित समाजाचे एकमेव नेते डॉ. **बाबासाहेब** आंबेडकर यांना दिनांक १४-१०-५६ रोजी विजया दशमीच्या शुभमुहूर्तावर महाथेरो चंद्रमणी यांनीं **धम्म दीक्षा** दिली असल्यानें दलित समाजांत त्यांच्याबद्दल अपूर्व आदर व्यक्त करण्यांत आला.

### बौद्ध दीक्षा देण्यास योग्य

महाथेरोंचे आगमन खास शृंगारलेल्या मंडपांत होतांच त्यांचें उपस्थित असलेल्या **दहा हजार** जनसमूहानें टाळयांच्या गजरांत स्वागत केलें. अध्यक्षस्थानीं सिद्धार्थ कॉलेजचे **प्राध्यापक** डॉ. **गोखले** होते. **श्री. आर. डी. भंडारे** यांनीं मुंबईतील जनतेच्या वतीनें स्वागताचें भाषण केलें. ते म्हणाले:— नागपूर येथें डॉ. बाबासाहेबांना पू. महामहाथेरो चंद्रमणी यांनीच धम्म दीक्षा दिली. (टाळया) पू. महाथेरो चंद्रमणी वयोवृद्ध व ज्ञानसमृद्ध आहेत. ज्यांची विद्वता जगन्मान्य आहे, ज्यांचें पावित्र्य शुद्ध आहे, जे भारतीय घटनेचे शिल्पकार आहेत, अशा वंदनीय डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना धम्म दीक्षा देण्यास सर्वतोपरी योग्य असे महाथेरो चंद्रमणी आहेत. (टाळया) आजच्या या मंगल प्रसंगीं आपण त्यांचे हार्दिक स्वागत करीत आहोंत. ते त्यांना मान्य होवो अशी मी सर्वांच्या वतीनें प्रार्थना करितो.

### डॉ. गोखले यांचा उपदेश

सभेचे अध्यक्ष डॉ. गोखले यांनीं धम्म दीक्षा घेतलेल्या डॉ. बाबासाहेबांचे व त्यांच्या अनुयायांचे अभिनंदन केलें. ते म्हणाले:—भारतांत बुद्ध धर्माचें पुनरागमन होत आहे. ही अत्यंत महत्वाची घटना आहे. बुद्धानुयायांनीं मात्र बुद्ध धर्मातील त्रिशरण आणि पंचशील यांच्यातील दिव्य आदेशांचे प्रतिपालन केले पाहिजे. सत्य बोलणें, नीतीनें वागणें, कामादि व्यसनापासून अलिप्त राहाणें, काम, क्रोध, वासना यावर विजय मिळवून संयम बाळगणें अशा या उदार मानवतावादी समता प्रेरीत सदगुणांचा अंगिकार केल्यानेंच बुद्ध धर्माचे पालन केल्यासारखें होईल. त्यांनींहीं महाथेरो चंद्रमणी यांचे स्वागत केलें.

### बुद्धत्व कसें प्राप्त होतें ?

उत्तरादाखल पू. महाथेरो चन्द्रमणी यांनीं आपल्या विद्वताप्रचुर वाणीनें अस्खलित दीड तास हिंदीत भाषण केलें. ते म्हणाले, बहूजन हिताय बहुजन सुखाय, व्रत भगवान बुद्धानें आचरिलें आणि इतरांना उपदेशिलें. गौतमाला बुद्धत्व प्राप्त होण्यापूर्वी त्याला दुःखावह हालअपेष्टांना तोंड द्यावे लागले. ते सहन करावे लागले. बुद्धत्व प्राप्त करण्याच्या (खरे ज्ञान) मानवी सुखाचा एकमेव मार्ग शोधून काढण्याचा त्यानें संकल्प केला. हा ठाम संकल्प सिद्धीस नेण्यासाठीं शरीरातील मांस झिजून गेलें, हाडाची काडे झाली, रक्त आटत गेलें, तरीहीं वृक्षा खालील भूमिवरून उठावयाचें नाहीं, अशाच निर्धारानें भगवान गौतमानें आपली बैठक मारली. या निर्धारापासून त्यास परावृत्त करण्यासाठीं **मार काम क्रोध** इत्यादि अहमहमिकेनें पुढें सरसावला. गौतम बुद्धाला या भूमिवर बसण्याचा अधिकार नाहीं असें सांगण्यांत आलें असता मी या ठायीं प्रथम बसलों म्हणून माझा या आसनावरील हक्क कोणीहि हिरावून घेऊं शकत नाहीं, असें गौतम म्हणाले. भगवान गौतमाला जे बुद्धत्व प्राप्त झाले तें सहजा सहजीं प्राप्त झालेलें नाहीं.

### बाबासाहेबांचें बुद्धत्व

फार हाल अपेष्टा सहन कराव्या लागल्या. त्याप्रमाणें डॉ. बाबासाहेबांना देखील तसेंच झालें. त्यांनीं पुष्कळ धर्मांचा अभ्यास केला. सत्‌धर्माचें संशोधन करीत होते. शेवटीं त्यांना **बहुजन हिताय। बहुजन सुखाय** असा बुद्ध असा धर्म सांपडला. डॉ. बाबासाहेब ज्याची इच्छा करीत होते, तें त्यांना सांपडलें; व त्याच धर्माचा स्वीकार केला. मी त्यांना धम्मदीक्षा दिली. **माझ्या जीवनाचें सार्थक झालें.** एवढया प्रचंड जनसमुहानें एकाच वेळीं महान पुढाऱ्याच्या प्रेरणेनें धम्म दीक्षा घेतली, हें अपूर्व दृश्य मी आमरण विसरणार नाहीं. बुद्धाला, धम्माला, संघाला शरण येणें हितावह आहे. इतकें बोलून त्यांचे भाषण संपले.

शेवटीं श्री. के. व्ही. सवादकर यांनीं महाथेरो चंद्रमणी, अध्यक्ष महाशय व उपस्थितांचें आभार मानलें. तसेंच सर्वांनीं महासभेचें सभासद व्हावें अशीं विनंती केली.

—x०x—

# नागपुरांत धर्मचक्र प्रवर्तन !

**बौद्धधर्म** दिक्षा समारंभाचा परम मंगल उत्सव घेण्यांचे नागपूरच्या वाट्याला यावे याबद्दल नागपूर जनतेला आनंदाचें भरते यावे हे स्वाभाविक आहे. नागपूरच्या इतिहासांतील हा आजरामर प्रसंग कधी न विसरण्या सारखा आहे. आजपर्यंत नागपूरचा थोर लौकिक त्यांच्या पराक्रमाला शोभेसा आहे. त्याच्या मागें फार मोठा इतिहास आहे. नागपूरला १९२० साली **शाहुमहाराजांचें** अध्यक्षतेखालीं एक परिषद घेतली होती. त्याच वेळेस **बाबासाहेबांचें** अदभूत व्यक्तित्व जनतेला प्रत्ययास आले व त्या क्षणापासून जनतेनें त्यांना आपला एकमेव नेता निवडला. १९३० ला **दुसरी अखिल भारतीय परिषद येथेच घेतली गेली**. १९३२ ला क्रांतिकारक स्वरूपाची **स्वतंत्र मतदार संघाची** मागणी करणारा ठराव **कामठीच्या** परिषदेंत एकमतानें पास करण्यांत आला.

क्रीप्स योजनेंत दलित जनतेला स्थान न मिळाल्यामुळें **१९४२** ला नागपूरला अखिल भारतीय दलित परिषद बोलावण्यांत आली. व तींत **शे. का. फे.** ची स्थापना करण्यांत आली. त्यानंतरचा बहुमान पुनः नागपूरला ह्या समारंभाने आणून दिला. ह्या सर्वांचें श्रेय नागपूरांतील दलित जनतेचा उत्साह, चिकाटी, कणखरपणा व धडाडी त्यावर अवलंबून आहे.

## नागार्जूनाचे नागपूर

**नागर्जून** हे बुद्धानंतर ६०० वर्षांमागें एक मोठे बौद्धपंडित होऊन गेले. त्यांच्या नांवावरून **नागपूर** हें नांव पडलें. पण हा इतिहास अजिबात दडपून टाकण्यांत आला. नागार्जूनाचा विहार अजूनही **रामटेकला** अस्तित्वांत आहे. आम्ही देखील एकेकाळीं बौद्धधर्मीय होतो हें बाबासाहेबांनीं संशोधन करून सिद्ध केलें आहे. इतर संशोधकांनीं असेंच मत प्रतिपादन केलें आहे. मद्रासमध्यें ४५ वर्षापूर्वी एका गृहस्थानें बौद्धधर्मांचे आम्ही वंशज आहो म्हणून बौद्ध धर्माचा प्रसार केला पाहिजे असा प्रयत्न केला होता. त्यावरून दलित लोक बौद्धधर्मीय होते हे निर्विवाद आहे.

: लेखक :
**रे. वि. कवाडे**
स्वागताध्यक्ष आंबेडकर बौद्ध दीक्षा विधी समारंभ, नागपूर.

## हिंदु धर्म कां नको.

माणसाला माणूसकीनं जगण्याचं आहे. तो कांहीं काळ गुलाम म्हणून राहिल पण सर्व काळ तसा राहाणें शक्य नाहीं. ज्या धर्मांत समानता बंधुत्व व स्वातंत्र्य नाहीं त्या धर्मांत माणसाची कुचंबना व विटंबना याशिवाय कसला फायदा आहे असे वाटत नाहीं. म्हणून त्या धर्माचा त्याग केलेला बरा हें निश्चित करून **बाबासाहेबांनी** १९३५ साली **येवले** मुक्कामी धर्मांतराची घोषणा करावी लागली. हिंदु धर्मीयांना बाबासाहेबांनीं शहाणें करण्याचा बराच प्रयत्न केला. पण हिंदुच्या अंगवळणी असलेली धार्मिक वृत्ती बदलणें अशक्य आहे असें दिसतांच व कायद्याचा आश्रय अपुरा वाटत असल्यामुळें त्या धर्माचा त्याग करणें व दुसऱ्या धर्माचा स्वीकार करणें त्यांना आवश्य वाटले. बाबासाहेबांनीं **काळाराम मंदिर** सत्याग्रह केला. **चवदार तळ्यावर** दलित जनतेला पाणी भरण्यांचा अधिकार प्रस्थापित करण्यास त्यांनीं लढा दिला. मनुस्मृतीची महाडला होळी करण्यांत आली. पण ह्या घटनांनीं हिंदुच्या वृत्तीस व कृतीत बदल झाला नाहीं. उलट कॉंग्रेसी पुढाऱ्यांनीं हिंदुच्या अत्याचारालाच आपल्या सहानुभुतीनें पाठिंबा दर्शविला. म्हणून ज्या धर्मांत मनुष्य मनुष्याला ओळखत नाहीं. चातुवर्ण्य पद्धति जा ठिकठिकाणच्या ठिकाणीं रहावयाचें आहे नव्हे ती कायम ठेवण्याकडें ज्या धर्मीयांचा चंग आहे तो धर्म सोडणें हाच एकमेव मार्ग बाबासाहेबांना वाटला.

## धर्मचक्र प्रवर्तन

एकदा केलेला निर्धार तो तडीस नेण्याचा व सर्व दलित जनतेचें हित करण्याचा मानस नागपूरला पूर्ण करण्यांत आला. बौद्ध धर्मांचें प्रसार कार्य सुरू होते. त्यावेळीं उपनिषदाची शाई वाळली नव्हता. बुद्धानें **धर्मचक्र प्रवर्तन सारनाथला** केलें. त्यावेळीं त्यांचें **पांच** शिष्य होते. पण नागपूर येथें ५ लाखावर लोकांनीं बौद्धधर्मांची दीक्षा घेतला आहे.

## समानतेच्या तत्वासाठीं

हिंदूचीं वृति बौद्धकाला इतका **कणखर** नसली तरी बरीच **कर्मठ** आंहे पण आंमचा आत्मविश्वास

(पान २२ पहा)

# समतेसाठीं बौद्ध धर्म स्वीकारला

( पान २१ वरून )

आहे.कीं काही काळानंतर समानतेच्या भुमीकेवर येण्यास त्यांना देखील ह्याच धर्माचा स्विकारणें भाग पडेल. नुसते शांताचा पाठ शिकवून बहूजन सुखाय म्हणणे पण कृति त्या विरुद्ध करणें, अहिसेंच्या तत्वाला हरताळ फासणें होय. तसे आम्ही दलितलोक करीत नाहीं. की करणार ताही? आमची ही क्रांतिकारक विचार पद्धति समानतेच्या तत्वांतून निर्माण झाली आहे. आजवर झालेला छळ व पिळवणूक झुगारून देऊन कसल्याच बाबीत आम्ही कमी नाही हे सामाजिक राजकीय व धार्मिक बाबोत ही तसें दाखवून द्यावयाचें आहे. त्या दृष्टीने बौद्धधर्मा इतका **सर्वोच्च** धर्म अगिकरण्यास कोणाच प्रत्यवाय नाही. दलित जनतेचा सच्चेपणा, देशाची इभ्रत कायम ठेवण्यास व ती टिकवून धरण्यास कारण ठरला. बलिदान हें दलितांचें ब्रीद आहे. पण त्या बलिदानावर त्याच्या इभ्रतीचें धिंडवडें निघत आहेत. केलेला स्वार्थत्याग दलित जातींत जन्मल्यामुळें मातीमोल वाटत आहे, हे हिंदुस्थानचें दुर्भाग्य म्हणावे लागेल. पण या पलिकडें जातीभेद नाहींसा करावा, सर्वांना सारख्याच प्रकारें स्वातंत्र्याचा उपभोग घेता यावा म्हणून बौद्ध धर्म स्वीकारणें हाच पवित्र मार्ग बाबासाहेबांनीं चोखाळला आहे.

## बौद्ध धर्माची पुनर्रचना

ज्या देशांत बौद्ध धर्म जन्मजात वाढला त्याच देशांत तो नाहींसा व्हावा याचें नवल वाटते. ब्राम्हणांनीं केवळ स्वार्थापाया ह्या उच्च धर्माला नेस्तनाबूत केलें. हिंदुराजांना बहकावून त्यांना आंधळे बनवून बौद्ध धर्मीयांची कत्तल केली. त्यांना नागावलें व शहराबाहेर हांकून देण्यांत आले. बंगालच्या **शशांक** राजानें तर कळसच केला. त्यानें १ लाख बौद्धधर्मीयांची कत्तल केली. हा दहशतवाद निर्माण झाल्यामुळें उरले सुरले भिख्खु व बौद्ध धर्मीय दुसऱ्या देशांत पळून गेले व जे राहिले ते आजच्या स्थितींत आपण आढळत आहोत. म्हणूनच त्या धर्माची पुर्नस्थापना करणें अगत्याचें आहे.

## आमची प्रगति

शिक्षणांतील वाढती कमान पहातां पूर्वीच्या मानानें आम्ही बरेंच सुज्ञ झालें आहोंत. हे सारे बाबासाहबांच्या प्रयत्नाचें व चळवळींचें फळ होय. ३६ वर्षाच्या काळांत निग्रो लोका इतकी आम्ही प्रगति करूं शकलो नाहीं. त्याला कारण आहे. निग्रोंना उदार मतवादी इंग्रजांचें सहाय्य होते. हिंदुस्थांनांत दलितांना पुरते पोटभर मिळायला येथें मारामार तशाही स्थितींत पुढें जाण्याचा त्याचा निर्धार वाखाणण्या सारखा आहे. हिंदु श्रीमंतांची मदत त्यांना नको होती, कारण त्यामुळें अंधवृत्ती व अपगंतत्व अकारण पदरीं आलें असतें.

ह्या ३६ वर्षाच्या काळाने जशा निग्रोंनी २ बँका उघडल्या, हजरोनी वकिल निर्माण केले, शेकडो डॉक्टर व वैज्ञानिक निर्माण केले इतकी प्रगति आम्ही करण्यास असमर्थ ठरलो पण राजकीय व सामाजिक बाबतीत केलेली प्रगति केव्हांही वाखाणण्या सारखी आहे. आज नागपूरांत १० जण वकिंली करीत आहेत ५० वर वकीली पास झाले आहेत. तर किती तरी पदावीधर आहेत

## आभार प्रदर्शन

अशा परिस्थितींत नागपूर भारतीय बौद्धजन समिती कडून हा कार्यक्रम घडविण्यांत आला त्याकरीता नागपूरची दलित जनता सहकार्याने व तळमळीने भरत करीत आहे त्याबद्दल त्यांना धन्यवाद देणे आवश्यक आहे. नागपूर जनतेनें उत्साहाने भाग घेऊन ही सभा व दिक्षासमारंभ यशस्वी करुन दाखविला त्याबद्दल मी स्वागत समितीच्या वतीने आभार मानतो. स्वयंसेवकाच्यां वक्तशीरपणा त्याचा शिस्त व संयम हा समारंभ सुरळीतपणें पार पाडण्यास कारणीभूत आहे. बाहेरून आलेले पाहूणें तसेंच इतर खेडेगांव व शहरांतून जी जनता आली त्यांच्या व्यवस्थेत जरी न्यूनता आढळली तरी त्याबद्दल ते क्षमा करतील अशी आशा आहे. शांततेने हा कार्यक्रम पार पाडण्यास सर्व जनतेनें सहकार्य केले त्याबद्दल त्यांचे आभार मानणे माझे कर्तव्य आहे. त्या सर्वांत स्वागत समितीच्या कार्य तत्परते मुळे व कामाची जबाबदारी वाटून घेतल्यामुळे हा कार्यक्रम होऊं शकला ही गोष्ट तीतकीच खरी आहे. पुन्हा संर्वांचे आभार मानतो.

—०—

# सत्त्याग्रहापासून धर्मांतराकडे

: लेखक :
**भाऊराव कृष्णराव गायकवाड**
[ नासिक ]

ता. १४-१०-१९५६ रविवार रोजीं नागपूर शहरी आमचे आवडते पुढारी **डॉ. बाबासाहेब आंबेडकर** यांचेकडून बौद्ध धर्माची दीक्षा घेतल्यामुळें अनेक स्पृश्या स्पृश्य मानलेल्या मित्रां कडून आम्ही धर्मांतर कां केले म्हणून विचारणा करण्यांत आली. भेटलें त्यांचे समाधान करण्याचा प्रयत्न केला. परंतु भेटले नसतील पण ज्यांना हा प्रश्न विचारावासा वाटत असेल अशा मित्रांसाठींच हा खुलासा करीत आहे.

### माणुस घाण्या धर्म

माझ्या बाळपणी मी जरी देव-देवता मानल्या असल्या व तरुणपणी हिंदु धर्मग्रंथांची पारायणें-उपासतापास-जत्राखत्रा केल्या असल्या तरी तो पर्यंत हिंदु धर्म काय चीज आहे याचा मी कधींच विचार केला नाहीं. इ. स. १९२७ सालीं डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा एक अनुयायी म्हणून **महाड** चवदार तळ्याच्या सत्याग्रहांत भाग घेतला. सदर प्रसंगी मनुस्मृती ग्रंथाची होळी करण्यांत आली. आपण या मनस्मृती ग्रंथाची कां होळी करतो याचा खुलासा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं मनस्मृती ग्रंथातील कांहीं उतारें वाचून दाखवून केला. हिंदु धर्मग्रंथ एकधर्मीय लोकांत किळसवाणा भेदा भेद कां व कसा करतात याचा विचार करूं लागलो, तव्हां असें कळलें कीं या माणूस घाण्या. धर्माचे वर्चस्व हिंदुची पोथ्या पुराणें व देव देवी मानण्यांत व त्यांच्या मांदिरा मुळें वाढत आहे. आणि म्हणून डॉ. बाबासाहेबांच्या आशिवरून व सहकारांच्या मदतीनें ता. २ मार्च मध्यें नाशिक येथें **काळाराम मंदीर प्रवेश सत्याग्रह** सुरूं केला. या सत्याग्रहानें स्पृश्य मानलेल्या सनातनी विचाराच्या हिंदूना हिंदूकवीच्या **"तुम्ही आम्ही सकल हिंदू-बंधू !"** या विचाराची आठवण करून दिली. कोणत्याही धर्माच्या लोकांत त्या त्या धर्माची प्रार्थना मंदिरे जर खुली असतात तर मग अस्पृश्य मानलेल्या हिंदू लोकांना ते मानीत असलेल्या धर्माची मंदिरे बंद कां असावीत ? हा प्रश्न धर्माच्या ठेकेदारांना विचारण्यांत आला. काळाराम मंदिराच्या चारहि दरवाज्यावर 'श्रीराम जय राम जय जय राम' म्हणून भजन करीत बसलेली शेंकडो मंडळी २ मार्च १९३० ते १० आक्टोबर १९३५ पर्यंत उणीपुरी साडेपांच वर्षे सत्याग्रह करीत बसली. उपयोग झाला नाहीं.

### मुखेड येथील घटना

इ. स. १९३१ च्या श्रावण महिन्यांत **मुखेड** ता. येवला या गांवी पांडव प्रताप ग्रंथाचें पारायण त्या गांवच्या मंडळीनीं लाविलें होते. पारायणाची समाप्ती करण्यासाठीं कांहीं मित्रांना त्यांनीं बोलाविलें होते. पांडव प्रताप ग्रंथाची मिरवणूक गांवच्या वेशीत येतांच स्पृश्य हिंदूनीं अडविली. मिरवणूक सार्वजनिक रस्त्यांनीं नेण्याचा आम्ही आग्रह धरला. स्पृश्य हिंदूनी तो चालूं दिला नाहीं. आम्ही रस्त्यावर धरणें धरून बसलो. रात्री १० वाजतां गांवचें सर्व हिंदु लोक हातांत लाठ्या, काठ्या व सरपणांत असलेली लाकडें घेऊनत्यांनी पांडवप्रताप ग्रंथाच्या मिरवणूकीचा हट्ट धरुन बसलेल्या लोकांवर हल्ला चढविला बरेच लोक रक्त बंबाळ केले. पांडवप्रताप ग्रंथ ज्या पालखींत ठेवला त्या पालखीवर घासेतल ओतून पालखी व पांडवप्रताप ग्रंथ जाळला हिंदूधर्मियांच्या या वागवणूची व विषमतेचे बीज पेरलेल्या हिंदूधर्म ग्रंथाचीं शिसारी आली. हा **हिंदूधर्म असा कसा** याचा सर्व 'अस्पृश्य मानलेले लोक विचारु करुं लागले या सर्व चळवळी करण्याचा आमचा जो हेतू होता तो देवाच्या दर्शनानें आपण पुणीत होऊं असें नव्हें; तर अस्पृश्य मानलेल्या लोकां विषयीं स्पृश्य मानलेल्या हिंदूच्या अंतःकरणात जी विषारी भावना असते ती घालवून त्याला माणुस बनाविणें व त्यांच्या माणूस बनण्यानें आपल्या वर्गावर त्यांच्या कडून हरघडी होत असलेला अन्याय दूर करुन सर्वांचे जीवन सुखी करणें. परंतु आमचा हा हेतू सतत साडेपांच वर्षे धरणें धरुन व रामनामाचा जय करुनहि साधण्याचें चिन्ह दिसेना. शेवटी डॉ **बाबासाहेब आंबेडकरांच्या** अध्यक्षतेखाली ता. १०-आक्टोबर १९३५ रोजी विराट सभा भरुन सभेनें नाशिकचा मंदीरप्रवेश सत्याग्रह थांबीवला व धर्मांतराची घोषणा केली. तदनंतर मुंबई व पुर्णे येथें प्रचंड जाहीर सभा भरुन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या धर्मांतराच्या घोषणेस पाठींबा दिला; इतकेच नव्हे तर हे

( पान २४ पहा )

# मी बौध्द दीक्षा घेतली

(पान २३ वरून)

धर्मांतर कोणीहि एकट्या दुकट्यानें न करता ते,

### सामुदायिक धर्मांतर

करावें अशी सर्वांना समज दिली. वेग वेगळ्या धर्मांचे परिशिलन करण्यांत व धर्म ठरविण्यांत वाजवीपेक्षां अधीक वेळ जात आहे म्हणून धर्मांतर करूं इछिणाऱ्यांनीं डॉ. बाबासाहेबानी आंबेडकरांची अनेकवेळा विनवणी केली. सर्वांना आवरून धरून आजपर्यंत डॉ. बाबासाहेबानी जगांत असलेल्या सर्व धर्मांचे सिंहावलोकन केलें. ज्या कारणासाठीं आपण धर्मांतर करतो आहोत त्या आपल्या इच्छा आकांक्षा पूर्ण करणारा जगांत जर कोणता धर्म असेल तर तो फक्त बौद्ध धर्मच होय हा निर्णय डॉ. बाबासाहेबानीं चार वर्षांपूर्वी घेतला. तेव्हांपासून आतां पर्यंत प्रसंगोपात बौद्ध धर्माची चर्चा आपल्या अनुयाया बरोबर केली; व त्यांना आपली मतें बनविण्यास पुरा अवसर दिला.

### मी धर्मांतरास कधी प्रवृत्त झालो

मी १९३५ पासून हिंदुधर्मांच्या देव देवतेस – पोथ्यापुराणास – तिर्थाटणास फाटा दिला. अनेक जाहीर सभामधून माझा देवावर विश्वास नाहीं असें जाहीर बोललो असल्याचे मला आठवते. मी मानवी धर्म मानतो असें म्हटले होते. मानवी धर्म म्हणजे मानवांचा धर्म माणसांनीं माणसा बरोबर माणसा सारखे वागावें यांतच मानवी धर्माची तत्वें साठविली आहेत असें माझें मत होते.

जो धर्म देवादिकांच्या भाकडवथा सांगून अनुयायांत धर्मांच्या नांवाखालीं ढोंगधत्तुरे माजवितो; माणसामाणसांत श्रेष्ठ कनिष्ठता निर्माण करतो; मानवाच्या अभ्युदयाला हात न देतां एकाला डोक्यावर तर दुसऱ्यास पायाखालीं तुडविण्याची जो शिकवण जो देतो; तो धर्म नाहीं, अधर्म आहे. असल्या धर्मास कोणी धर्म म्हणूं नये हे सांगत आलो आहे. बौद्ध धर्मांच्या शिकवणुकीचा जर आपण विचार केला तर आज धर्म न मानणाऱ्या, पण मानवी धर्म हवा म्हणून म्हणणारांना बौद्ध धर्म हाच एक मानवी धर्म आहे हे पटेल. बौद्धमर्ध हा प्रत्यक्ष अनुभवास अगर प्रचितिस न येणाऱ्या परमेश्वराला मानीत नाहीं. बौद्धीक कसोटीला जी गोष्ट पटेल तीच मान, कोणी सांगतो म्हणून अंध विश्वास ठेवून ती मान, अशी सक्ती कधींही करीत नाहीं. माणसामाणसांत श्रेष्ठ कनिष्ठ हा भेद मानीत नाहीं. जगांत दुःख आहे. दुःखी असलेल्यांचें दुःख दूर करून सुखी करण्यास झटण्याची जो अनुयायांना शिकवण देतो तो बौद्ध धर्म सर्वश्रेष्ठ होय. इतरहि बाबतींत विचार केल्यास मनुष्यास निति नियमानें पूर्णत्वास नेणारा फक्त बौद्ध धर्मानेंच आहे.

वर उल्लेख केलेल्या बाबींवरून हें ध्यानीं येईलच कीं माणसामाणसांत श्रेष्ठ कनिष्ठ असले ओंगळ, किळसवाणें व लांछनास्पद भेद माणण्याची हिंदूधर्मानें शिकवण देऊन कोट्यावधी अस्पृश्य मानेलल्या जनतेचें हाल हाल करुन साध्या माणूसकीस त्याना पारखे केले. शिक्षणाची द्वारें अस्पृश्य मानलेल्यांना बंद करुन पिढयान पिढया अज्ञानाच्या खाईत त्यांना ढकलले; स्पृश्य वर्गीय हिंदूची सतत सेवा करुन **देतील ती भाकरी** व **सांगतील ती चाकरी** करण्याची पिढयान पिढया गुलामगिरी आम्हां लोकांच्या गळ्यांत धर्मांच्या नांवाखाली अडकविली. अशा त्या हिंदूधर्मांचा मी एक घटक म्हणून म्हणण्याचा ज्या ज्या वेळी प्रसंग येई तेव्हां तेव्हां काळीज चर्रर होऊन मी हिंदू आहे हे लिहिण्यास लाज वाटे. हात ते लिहिण्यास धजत नसें. अशा त्या हिंदू धर्माचा त्याग मोठा आनंदानें मी केला आहे; आणि डॉ बाबासाहेब आंबेडकरांच्या दिव्य शिकवणीनुसार बौद्ध धर्माची दीक्षा घेतली आहे.

—×○×—

## ॥ नमो बुद्धाय ॥

भारतीय बौद्ध महासभा शाखा बुद्ध विहार, सिद्धार्थ नगर कामठी यांच्या विद्यमानें:—

कळविण्यांत अत्यंत आनंद होतो कीं, परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचें धर्मगुरु ब्रम्हदेशीय पूज्य भिक्षु चंद्रमणी महास्थविर आणि यांजबरोबर असणारे पूज्य भि. एम. संघरत्न, भिक्षु एच सद्धातीस, भि. जी. प्रज्ञानंद, भि. डी. विल्सीन्हा, क. वि. उमरे; एन. एच. कुंभारे. यांनी सिद्धार्थ नगरला धावती भेट दिली. तत्प्रसंगीं पुज्य भि. चंद्रमणी महास्थवीर यांनीं सर्वांना उभे करून त्रीशरण पंचशीला ग्रहण करविली. त्या नंतर आपली परिस्थिती कशी बदलेल याबद्दल विपयी उत्कृष्ट आचरणशील व धर्मशील भाषण केलें. त्यानंतर पांचाही भिक्षुनी परीत्राण म्हणवून सर्वत्रास शुभाशिर्वाद दिला. महाबोधी सोसायटीचें जनरल सेक्रेटरी श्री. डी. विल्सीन्हा यांनीं भगवान बुध्दाचे चरित्र चित्र व भारतातील प्रसिध्द बौद्ध स्थळे यावर मॅजिक लॅन्टर्न शो दाखविलें या शिवाय पांचा भिक्षु सहीत बुद्धाच्या मूर्तिचें व सर्वत्र बौद्ध मडळाचे छाया चित्र घेऊन कार्य सर्वानुमते बाबासाहेब आंबेडकरांच्या जय घोषांत कार्य समाप्त झाले.

डॉ. आंबेडकर करे पुकार
बौद्ध धर्मका करो स्वीकार

—०—

## बौद्ध-दीक्षा घेण्याच्या आदले दिवशी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं वृत्तपत्रकारांना दिलेली मुलाखत

# सवलतींसाठीं अस्पृश्य रहावे काय?

**" मी गांधीजींना असें आश्वासन दिलें होतें कीं, कमीतकमी हानिकारक मार्ग मी स्वीकारीन. तदनुसार आतां बौद्ध धर्म स्वीकारून मी हिंदु समाजाच्या दृष्टीनें एक, उपकारक कृत्यच करीत आहे. कारण, बौद्ध धर्म हा भारतीय संस्कृतीचेंच अंग आहे," असें उद्गार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं ता. १३-१०-५६ रोजीं सायंकाळीं 'धर्मांतरा'विषयीं पत्रकारांशीं बोलतांना काढले. वृत्तपत्रकांराबरोबर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची जी मुलाखत झाली ती खाली दिलेली आहे.**

या धर्मांतरामुळें घटनेनें अस्पृश्य वर्गाला ज्या खास सवलती दिल्या आहेत, त्या जातील त्याविषयीं काय ? असा प्रश्न विचारला असतां ते म्हणाले:- " सर्वसामान्य नागरिकासाठीं ज्या सवलतीची तरतूद केलेले आहे, त्या धर्मांतरानंतर आम्हाला मिळतील. पण खास सवलतींचा प्रश्न कां उपस्थित करतां ? त्याविषयी चिंता कशाला ? घटनेने दिलेल्या खास सवलतींचा लाभ उठविता यावा म्हणून आम्ही सदासर्वकाळ अस्पृश्यच रहावें, असें तुम्हाला वाटते काय ? आम्ही मनुष्यत्व गांठण्याचा प्रयत्न करीत आहोंत घटनेने दिलेल्या खास सवलती मिळाव्यात म्हणून ब्राम्हण अस्पृश्य होतील कां ? "

एक वार्ताहर- त्यांना त्यांची गरज नाहीं !

डॉ. आंबेडकर- कदाचित त्यांना तशा खास सवलती मागण्याचाहि काळ येईल. नाहीं कोणी म्हणावे ? पण पूर्वी जेव्हां आम्ही विभक्त मतदार संघाची मागणी केली तेव्हां गांधीजींनी विरोध केला. मग आतांच खास सवलतीचा मुद्दा कां पुढें केला जातो ? बौद्ध धर्म स्वीकारताना खास राजकीय हक्कामध्यें माझें हितसंबंध गुंतलेले नाहींत. आणि जर विभक्त मतदार संघ आहेत, त्याची अवस्था अशी आज काय आहे ? काँग्रेसनें सर्वच जागा बळकावल्या आहेत ना ? आणि आज अस्पृश्यांचे म्हणून जे प्रतिनिधि राखीव मतदार संघांतून काँग्रेसच्या तिकिटावर निवडून गेले त्यांनीं कधी तरी अस्पृश्यांचे हिताचे कांहीं केलें आहे काय ? अशा जागा घेऊन करावयाचें तरी काय ?

### प्रथम विचारक्रांति आवश्यक

**प्रश्न**-आपण धर्मांतराचा निर्णय कां घेतला ?

**उत्तर**-शतकानुशतकें सवर्ण हिंदुनी आणि विशेषतः ब्राम्हणांनी आमच्याशी गैर व्यवहार केला म्हणून ! ज्यांच्या नाकाला कांहीं घाण असेल, तो प्रत्येक जण बौद्ध होईल. बौद्धधर्म हा विश्वधर्म आहे. माझें क्षेत्र मला केवळ अस्पृश्यांपुरेंतच मर्यादित करावयाचें नाहीं. संपूर्ण भारतांत धर्मचक्र प्रवर्तन घडवून आणावयाचे आहें. मी सांगतो तें चिरकाल मानावें, असें बुद्धानें कधीहि सांगितलें नाहीं. जे मी सांगितलें तें काळाशी विसंगत असेल तेव्हां त्यांत परिवर्तन करावे, असें सांगून त्याने इतकी मोकळीक दिली आहे. प्रथम लोकांच्या विचारांत क्रांति करावी लागते, मग आचारक्रांति होते.

**मुलाखतीतील प्रमुख मुद्दे :**

- ★ सवलतीसाठीं सदासर्वकाळ 'अस्पृश्यच' रहावें काय ?
- ★ विचारक्रांती प्रथम हवी, आचार क्रांती मग होईलच.
- ★ राजकारण सोडणार नाहीं.
- ★ नवीन व्यापक पक्ष स्थापणार.
- ★ द्विभाषिक मोडून काढू.

**प्रश्न**:-विचारांत आणि आचारांत कांहीच तफावत रहाणार नाहीं काय ?

**उत्तर**:-फरक पडतोच; पण धर्माचे शिक्षणहि समाजाला द्यावे लागते

### अस्पृश्य वर्गातून जातिभेदाचे उच्चाटन करीन

**प्रश्न**:-पण एक जातिभेद सोडला तर तुम्ही बौद्ध आणि हिंदु धर्मांत काय फरक दाखवाल ?

**उत्तर**:-प्राण सोडला तर शरीरांत काय राहिलें, अशा सारखाच हा प्रश्न आहे. हा जातिभेद तुम्हीच पाळतां ना ? जातिभेद वाढविला कोणी ? ब्राह्मणांनीं आम्हाला आणि मराठ्यांना कधीहि मतस्वातंत्र्य दिलें नाहीं.

( पान २६ वर पहा )

( पान २५ वरून )

प्रश्नः–हा जातिभेद अस्पृश्य वर्गांतहि होतो ना ? तो बौद्धधर्म स्वीकारानंतरहि कायम रहाणार नाहीं कशावरून ?

उत्तरः–तो आम्ही तुमच्या कडूनच घेतला ना ? पण त्यास आम्ही प्रतिरोध तर करूं शकतो. मी शूर आणि धीट आहे. मी लोकांना कसें वागावे, याचे आदेश देईन नाहीं तर मी एकटाच बुद्ध होईन त्यांत बिघडले कोठे ? आणि माझा तर असा प्रश्न आहे कीं, बुद्ध-कालीन ब्राह्मणांना बौद्ध धर्म कसा पटला ? आणि आतांच तो कां पटत नाहीं. मी हा प्रश्न माझ्या जाहीर भाषणांत विचारणारच आहे.

### राजकारण सन्यास घेणार नाहीं.

प्रश्न–धर्मांतरानंतर शे. का. फे. चे काय होणार ?

उत्तर–कदाचित् तो कायम राहील किंवा नवा पक्ष स्थापन होईल. मी मात्र बौद्ध धर्मांत प्रवेश केल्यानंतर शे. का. फे. चा सदस्य रहाणार नाहीं.

प्रश्नः–बौद्ध धर्म स्वीकारल्यानंतर आपण काय करणार ?

उत्तरः–मी 'मिशनरी' होणार आहे. पण राजकारणाचा संन्यास मात्र घेणार नाहीं. निवडणुकीलाहि निश्चितपणें उभा राहीन.

### नवीन पक्ष व्यापक रहाणार

प्रश्नः–रिपब्लिकन पार्टी स्थापन करण्याचे आपण निश्चित केले आहे काय ?

उत्तरः–हो तें नक्की ठरलें आहे. मी त्या पक्षाची घटनाहि तयार केली आहे. त्याच्या प्रिॲंबलमध्यें स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व या तत्वावर हा पक्ष आधारलेला राहील असें मी स्पष्ट केलें आहे. पार्लमेंटमध्यें येणाऱ्या प्रत्येक विधेयकाची कसोटी या तीन निष्कर्षांवर पाहिली जाईल.

प्रश्नः–पण पक्षाचे तत्त्वज्ञान कोणते राहील ?

उत्तरः–पक्षासाठीं मुख्य गरज असते ती कणखर नेत्याची.

प्रश्नः–या पक्षाचें स्वरूप व्यापक राहील काय ?

उत्तरः–हो या पक्षांत सर्वांना प्रवेश दिला जाईल.

### द्विभाषिक मुंबई राज्य मोडून काढीन

प्रश्नः–द्विभाषिक विषयीं आपलें काय मत आहे ?–तें टिकेल का ?

उत्तरः–तें मोडून काढणें हें तर माझें आद्य कर्तव्य आहे. ज्या सांस्कृतिक सीमा भारतात स्वाभाविकपणें निर्माण झाल्या आहेत, त्या आपण बदलूं शकत नाहीं.

— ० —

## बौद्धांना हिंदु म्हणणे खोडसाळपणाचे

पुणें दि. २२:—"कोणत्याहि बुद्ध भक्ताला आपण हिंदु नाहीं असें म्हणता येणार नाही असें विधान केंद्रिय मंत्री हरिभाऊ पाटसकर यांनी जाहीर केले आहे तें धांदात खोटें आहे. इतकेंच नव्हे तर तो भारत, आशिया व युरोप खंडांतील बौद्धधर्मीय लोकांचा अपमान आहे," अशा आशयाचे उद्गार भारतीय बौद्धजन समितीचे चिटणीस व माजी कार्पोरेटर श्री. वि. रा. रणपिसे यांनीं अध्यक्ष या नात्यानें पुण्यातील प्रमुख दीडशें कार्यकर्त्यां समोर बोलतांना काढले.

भारतीय बौद्धजन समितीच्या पुणे शाखेच्या वतीनें काल रात्रीं शिवाजी नगर येथील समितीच्या कार्यालयांत प्रमुख कार्यकर्त्यांची सभा घेण्यांत आली होती. सभेस देहूरोड, दापोडी, बोपोडी, खडकी, वानवडी, येरवडा, घोरपडी, पुणे कॅम्प आणि शहरांतील वस्त्यांतील मिळून दीडशेंच्यावर कार्यकर्ते हजर होते. अस्पृश्यांना बौद्ध धर्माची सामुदायिक दीक्षा देण्यासाठीं डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना पुण्यास बोलवावे आणि होणाऱ्या खर्चासाठीं वर्गणी रुपानें नीधि गोळा करण्यांत यावा असा ठराव पास करण्यांत येऊन दुसऱ्या ठरावानें केंद्रिय मंत्री श्री. हरिभाऊ पाटसकर यांनीं जे वरील विधान केलें त्या विधानाचा निषेध करण्यांत आला. तिसऱ्या ठरावानें डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या अनुयायां समवेत नागपूर येथें बौद्ध धर्माची दीक्षा घेतली त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यांत आले. सभेंत माजी कार्पोरेटर श्री. ज. वि. चव्हाण, श्री. आर. डी. साळुंके माजी शिक्षण मंत्री भोर; भारतीय बौद्धजन समिति खडकी विभागाचे अध्यक्ष श्री. डी. बी. सोनवणे. खडकी कॅन्टोनमेन्ट बोर्डाचे सभासद श्री. पं. सं. गायकवाड. देहूरोड बुद्ध मंदिर समितीचे सेक्रेटरी हरि गंगाराम चैरे. येरवडा बौद्धजन समितिचे सेक्रेटरी श्री. राज साळवे, एम. डी. शिंदे शंकर विष्णु मोतलिंग, श्री. शंकरराव उबाळे, श्री. डी. के. कांबळे, एम. डी. शिंदे, श्री. ओव्हाळ यांची भाषणें झाली.

—०—

## बौद्ध--दीक्षा विधीच्या आदले दिवशीं नागपूर कसें होते?

# नागपूर बौद्ध धर्म क्षेत्र बनलें

विजयादशमीच्या शुभ मुहूर्तावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे वैदिक धर्माचें सीमोल्लंघन करून जी बौद्ध धर्माची दीक्षा नागपूर मुक्कामी घेणार आहेत, ती पाहून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडण्यासाठीं आणि आपल्या या असामान्य नेत्याच्या मागोमाग स्वतः बौद्ध धर्माचा स्वीकार करण्यासाठींहि भारताच्या चारी कोनांतून हजारो अस्पृश्य नागपूरांत आले. रेल्वे, मोटारी, रिक्शा, बैलगाड्या आदि वाहनांचा उपयोग दूरदूरून येणाऱ्या लोकांनी केला. पण, थेट पुण्यापासून, पंढरीच्या वारीला जावें त्याप्रमाणें, हजारों अस्पृश्य पायीं प्रवास करीत नागपूर येथें येऊन पाहोंचले. त्यांच्या उत्साहाला मर्यादा नव्हती. 'जय भीम' च्या घोषणांना खंड नव्हता. एके काळीं बौद्ध महापंडित नागार्जुन याच्या वास्तव्यानें पुनीत झालेलें नागपूर हे अस्पृश्य वर्गाचे धर्मक्षेत्र झालें. यांत शंका नाहीं. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यानीं केलेल्या धर्मचक्रप्रवर्तनाच्या समारंभासाठीं दक्षिण अंबाझरी रस्त्यावर अंधविद्यालयापलिकडच्या प्रशस्त पटांगणात बुद्धकालीन शिल्पाचें स्मरण करून भव्य स्तूप उभारण्यांत आलेला होता. सुमारें पांच लाख माणसें एकत्र बसू शकतील असा खुला मंडप घालण्यांत आला होता. या मंडपाच्या समोर सडकेच्या डाव्याबाजूला दुकानांची ओळ थाटलेली असल्यामुळें या निर्जन पटांगणाला आज प्रचंड यात्रेचें स्वरूप आलेलें दृष्टीस पडलें.

या प्रसंगीं नागपूर येथील 'तरुण भारत' या स्थानिक वृत्तपत्रानें ता. १५।१०।५६ रोजीं प्रसिद्ध केलेला वृत्तांत त्या प्रसंगाची कल्पना यावी, म्हणून खालीं दिला आहे.

"येथील श्रद्धानंद पेठेंतील चोखामेळा वसतिगृहाशेंजारील भव्य मैदानात ता. १४ रोजी सकाळीं बौद्ध धर्माचा सामुहिक दीक्षा समारंभ होणार आहे त्यानिमित्ताने तेथे एक भव्य मंडप तयार करण्यां आला असून दीड लक्षाहून अधिक जनसमुदाय तो सहज सामावून घेईल. एवढ्या जागेभोंवतीं चारी बाजूंनी तट्टे लावून हा खुला मंडप उभारण्यांत आला आहे. हे काम गेल्या आठ दिवसांपासून सुरू असून शेकडो अस्पृश्य लोक त्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रकाचें श्रमदान करीत आहेत. अनेक लोकांनी अनेक प्रकारची दानें या कार्यासाठीं दिली आहेत आतापर्यंत सुमारे ५० ते ७५ हजार रूपयाचे निरनिराळ्या प्रकारचे दान प्राप्त झालें आहे. असें दीक्षा समारंभाचे एक कार्यवाह श्री. पंचभाई यानीं सांगितलें. याशिवाय सुमारे २५ ते ३० हजार रूपयांचा गोळ खर्च दीक्षा समारंभ समितीला करावा लागणार आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या वरील आपली श्रद्धा आपल्या मार्गातील सर्व अडचणी दूर करील, वशा विश्वास अनेक कार्यकर्त्यांना वाटत आहे.

### पावित्र्याची भावना

ता. १४-१०-१९५६ रोजीं सकाळी जेल रोडवरुन श्रद्धानंद पेठेकडे जाणाऱ्या रस्त्या वर झाडझुडीचें काम करणाऱ्या मेहेतरांतहि उत्साह ओसंडून वहात होता. दीक्षासमारंभासाठी बाबासाहेब ज्या मार्गानें जाणार तो मार्ग साफ करण्याचे भाग्य आपल्याला लाभलें, यांत त्यांना आपला गौरव झाल्यासारखा वाटत होता आणि रस्त्याची सफाई अत्यंत तत्परतेनें आणि एकचित्त होऊन केली जात होती. हीच आत्मयितेची आणि पवित्र्याची भावना इतरहि अनेक कामांत व्यक्त होत होती. बाहेर गांवाहून येणारे जत्थे चार चारच्या रांगेत शिस्तीनें मार्गक्रमण करीत होते आणि "डॉ. बाबासाहेब आंबेडकर करे पुकार-बौद्ध धर्मका करो स्वीकार" असा घोष पुनः पुनः कंठरवानें करीत होते.

### बुद्ध भिक्षु आणि डॉ. आंबेडकर यांचे आगमन

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना बौद्ध धर्माची दीक्षा देण्यासाठीं कांशिया (प्राचीन इतिहासांत कुशीनारा या नांवानें ज्ञात असलेल्या) या गांवाहून सुप्रसिद्ध ब्रम्ही बौद्ध भिक्षु चन्द्रमणी महास्थवीर हे आज नागपुरास येऊन पोंचले आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे आपल्या

( पान २८ वर पहा )

(पान २७ वरून)

सुविद्य पत्नी सौ. लक्ष्मीबाई उर्फ माईसाहेब यांच्यासह दोन दिवसांपूर्वी नागपुरांत आले आहेत. ते सीताबर्डीवरील हॉटेल श्याममध्यें उतरले आहेत. उद्या सकाळीच भिक्षु चन्द्रमणी महास्थविर हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि सौ. माईसाहेब यांना बौद्ध धर्माची दीक्षा देतील.

## बुद्धीला पटेल तरच होकार द्या

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं यापूर्वीच अस्पृश्य समाजाला असें आवाहन केलें आहे कीं, "तुम्ही हिंदु धर्मांत राहिलात तर तुमचें राजकीय हक्क जातील. तुम्हाला राजकीय हक्क बुडूं द्यावयाचें नसतील, तर धर्मांतर करा. धर्मांतरानेच ते कायम राहणार आहेत. पण मी सांगतो म्हणून धर्मांतर केलें पाहिजे, या भावनेला वश होऊन कांहीं करूं नका. तुमच्या बुद्धीला जर पटेल, तर त्याला होकार द्या."

## स्तूपासमान स्मारक उभारणार

डॉ. बाबासाहेब आंबेडकर ज्या बुद्धकालीन स्तूपासारख्या दिसणाऱ्या व्यासपीठावरून धर्मचक्रप्रवर्तन करणार आहेत, त्याठिकाणी एक स्तूपासमान स्मारक उभारण्यांत यावयाचें आहे. त्यामुळें यापुढें नागपुर हें बौद्ध धर्माचें पुन्हां नव्यानें तीर्थक्षेत्रच होऊन बसण्यांची शक्यता आहे. बौद्ध महापंडित नागार्जुन याची गुहा रामटेकच्या टेकडींत असल्यामुळें नागपूर हें पुरातन कालापासून बौद्धांचे क्षेत्र मानलें गेलेलें होतें. या अभूतपूर्व घटनेनें त्याचें महात्म्य आतां शतगुणित होईल.

## अस्पृश्य समाजाचें नवें धर्मक्षेत्र

अस्पृश्य समाजाच्या गेल्या पंचवीस वर्षाच्या इतिहासांत नागपूराला एक आगळें स्थान यापूर्वीच प्राप्त झालेलें आहे. डॉक्टरसाहेबांनीं संयुक्त मतदार संघाला विरोध करून विभक्त मतदार संघाची मागणी करणारा ठराव प्रथम १९३० सालीं कामठी येथेंच केला आणि नंतर १९४२ च्या सुमारास शेडयुल्ड कास्ट्स् फेडरेशनची स्थापना करण्याचा निर्णय मद्रास येथें घेण्यांत आला हें जरी खरें, तरी शे. का. फे. चें पहिलें अखिल भारतीय अधिवेशन नागपुरांतच झालें. आणि आतां डॉ. बाबासाहेब आंबेडकर नागपुरांतच बौद्ध धर्माची दीक्षा घेत असल्यामुळें त्याला धर्मक्षेत्राची प्रतिष्ठा प्राप्त होणार आहे.

## भारत सरकार फिल्म घेणार

अस्पृश्य समाजाच्या इतिहासांतील ही एक महत्वपूर्ण घटना असल्यामुळें भारत सरकारतर्फे या समारंभाची पूर्ण डॉक्युमेन्टररी फिल्म घेण्यांत येणार असून, डॉ.बाबासाहेब आंबेडकर याचें भाषणहि रेकॉर्ड केलें जाणार आहे.

## जगाचे डोळे लागले

नागपुरांतील आणि नागपुरांत बाहेर गांवांहून झालेला हजारोंच्या संख्येंतील अस्पृश्य समाज उद्याच्या या भव्य धर्मचक्रपर्वतन समारंभाची तहानभूक विसरून उत्कंठेने प्रतीक्षा करीत आहेत यांत नवल नाहीं. पण सर्व जगाचे डोळे आज या समारंभाकडे लागले असून, सर्व देशांचे वार्ताहर येथें आलेले आहेत.

--o--



## "मातंग बंधुनों, समतेचा बुद्धधर्म स्वीकारा"

### श्री. खंडाळे यांची विनंती.

भुसावळ येथें दि. १७-१०-५६ रोजीं रात्रौ ९ वाजतां मांगवाड्यांत मातंग समाजाचे प्रमुख पुढारी **आर. जी. खंडाळे** यांचे अध्यक्षतेखालीं मांग लोकांची जाहीर सभा झाली. सभेंत, श्री. **आर. सी. शेलार** श्री. **नागू तुळशीराम कसबे** यांची बुद्ध धर्मावर परिणामकारक भाषणें झाली.

नंतर अध्यक्ष श्री. खंडाळे हे आपल्या भाषणांत म्हणाले कीं:- नागपूर येथें दसऱ्याचे दिवशीं ता. १४-१०-५६ रोजीं डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे समवेत मी बुद्ध धर्माची दीक्षा घेतली. शिवाय नागपूरच्या कांहीं मांग लोकांनीं त्याच वेळीं बुद्ध धर्म स्वीकारला, आणि भुसावळ येथील ५० कुटूंबातील मांग मंडळी बुद्ध धर्माची दीक्षा घेत असल्या मुळें मला अत्यानंद वाटत आहे. चीनच्या बादशाहाचें निमंत्रणावरुन,बुद्ध धर्माचा प्रचार करणेंसाठीं, भारतामधून, धर्मरत्न व काश्यप मातंग हे दोन बुद्ध प्रचारक चीन देशांत गेले, व लोयांग श्वेताश्व मठांत बुद्ध धर्माची शिकवण देत होते. आणि संस्कृत ग्रंथाचें चिनी भाषेंत भाषांतर करीत होते. यावरुन आपण सर्वजन कल्पना करा पूर्वी मांग समाज बुद्ध धर्मीय होता. म्हणजे बुद्धधर्म मातंग जातीचा जुनाच धर्म आहे. समता, बंधूभाव न्याय आणि प्रज्ञा यांचा पुरस्कार करणारा बुद्धधर्म आहे "बहुजन हिताय" बहुजन सुखाय हा भगवान गौतमबुद्धाचा संदेश आहे. तेव्हां सर्व मातंग बंधुनीं. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचें पावलावर पाऊल टाकून, मांग लोकांनीं बुद्ध धर्माची दीक्षा घ्यावी; अशी कळकळीची विनंती आहे. डॉ. बाबासाहेब व भगवान गौतम बुद्ध यांचें जय घोषांत सभा विसरजन झाली.

—o—

नागपूर येथील बौद्ध दीक्षा विधीचे विवेचनात्मक वर्णन

लेखकः– बी. सी. कांबळे, मुंबई.

# धर्म पुरुषाची वाणी !

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी आपल्या पत्नी सौ. माई साहेब आंबेडकर यांच्यासह नागपूर येथें ता. १४-१०-५६ रोजीं जी बौद्ध दी I घेतली व नंतर सुमारे ५ लाखापेक्षां अधिक दलित बांधवाच्या महासागरास तशीच बौद्ध दीक्षा दिली, या दोन ऐतिहासिक प्रसंगानें घडलेला इथंभूत वृत्तांत सदर लेखामध्यें दिलेला आहे. ज्या कोणा दलित बांधवास कांहीं अडचणीस्तव नागपूर येथील बौद्धदीक्षा समारंभास येता आलेले नाहीं त्यांना केवळ आपल्या डोळ्यांनीं तो समारंभ पहाता आला नाहीं, एवढीच उणीव दूर केली तर समग्र माहिती वाचन रुपानें मिळावी या हेतूनें सदर लेखांतील माहितीची रचना केलेली आहे. जे लोक प्रत्यक्ष नागपूरला आले त्यांना, त्याचप्रमाणें, जे येऊं शकले नाहींत त्यांनाही सदर माहिती उपयुक्त वाटेल असा भरवसा आहे. सदर माहिती, पार्श्वभूमि प्रत्यक्ष वर्णन, व भाष्य या तिन्ही प्रकारें ग्रथित केलेली आहे. वाचकांनीं सदर माहिती अवश्य वाचावी.

## ता. २३-९-५६ चें ऐतिहासिक निवेदन

या बौद्ध दीक्षा विधी समारंभाच्या माहितीची सुरवात ता. २३-९-१९५६ पासून करावी लागेल. या तारखेस **डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं**, दिल्लींतील २६, अलिपूर रोडच्या आपल्या निवासस्थानांतून एक निवेदन जाहीर केलें. तें निवेदन बिलकूल छोटें होतें. जेमतेम ४।५ ओळींचा मजकूर त्यामध्यें होता. भारतांमध्यें बौद्ध धर्मांचें पुनरुज्जीवन करण्याकरितां प्रत्यक्ष बौद्ध धर्म स्वीकाराचा जो इतिहास लिहिला जाईल, त्यामध्यें इतिहासकारांना या निवेदनास खास महत्व द्यावें लागेल. एवढेंच नव्हे तर भारतीय भूमींत बौद्ध धर्माच्या पुनःश्च बीजारोपणाचें त्यामुळें भारतभर व्हावयाच्या प्रचंड प्रसाराचे मूलांकूर या निवेदनामध्यें सांपडतील. तें छोटें निवेदन खालील प्रमाणें होतें.

> २६, अलिपूर रोड,
> दिल्ली, २३-सप्टेंबर-१९५६
>
> "बौद्ध धर्म स्वीकारण्याचा दिवस व ठिकाण मी आतां निश्चित केलें आहे. दसऱ्याच्यादिवशीं, ता. १४ आक्टोबर १९५६ रोजीं नागपूर येथें मी बौद्ध दीक्षा घेणार आहे.
>
> या दिवशीं सकाळीं ९ ते ११ माझा धर्म-दीक्षा विधी समारंभ होईल, व संध्याकाळीं माझें सर्व लोकांसाठीं जाहीर व्याख्यान होईल."
>
> **बी. आर. आंबेडकर**
> २३-९-५६

हें निवेदन वृत्त पत्रांत प्रसिद्ध झालें होतें. दैनिक बातम्या देणाऱ्या भारतीय वृत्तपत्रांनीं, हें त्रोटक निवेदन, त्यांच्या सोई प्रमाणें, एका कॉलममध्यें तसेंच दिलें. जणू अनेक बातम्यांपैकीं, ही नित्यापैकीं एक बातमी असावी त्या प्रमाणें वृत्तपत्रांनीं त्या निवेदनाची सामान्य दखल घेतल्याप्रमाणें वर्तन केलें; व त्या बातमीवरून डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे बौद्ध धर्म स्वीकारणार ही माहिती अखिल भारतीयांना कळली.

## धर्म पुरुषांची प्रथम वाणी

तथापि, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या या त्रोटक निवेदनामध्यें किती विलक्षण सामर्थ्य आहे व तें भारतीय समाज रचनेचा विचार करतां, किती असामान्य प्रतीचें आहे, याची कल्पना भारतीय वृत्तपत्रांना जवळ जवळ आलीच नाही, असें म्हणावें लागते. या निवेदनांतील वृत्त नेहमीच्या वृत्तांप्रमाणें नव्हतें. रोजची वृत्त पत्रांत येणारी बातमी व सदर निवेदन यामध्यें

[ पान ३० पहा ]

# ५ कोट बौद्ध होणार !

( पान २९ वरून )

सर्व दृष्टींनीं [illegible] फरक होता. ज्या ज्या धर्मसंस्थापकांनीं, अगर त्या त्या धर्मांचे पुनरज्जीवन करणाऱ्या महापुरुषांनीं, धर्म स्थापनेसाठीं अथवा त्या धर्मांतरील [illegible] ग्लानी दूर करण्यासाठीं आपली प्रथम वाणी उच्चारली त्याप्रमाणें त्या प्रथम वाणीची बातमी पोहोचविणारें हें निवेदन होतें.

## बौद्ध दीक्षेचा निश्चय करण्या पूर्वी

सदर निवेदनावर सही करण्यापूर्वी त्याच प्रमाणें बौद्ध दीक्षेचा विधी, ठिकाण व तारीख ठरविण्यापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं किती तासन तास विचार केला असेल याची कल्पना कोणासही येणार नाहीं. हा निर्णय घेण्यापूर्वी, त्यांच्या नजरेपुढें या घटनेचें संभाव्य असें कोण कोणते परिणाम, भारतांतील दलित जनतेवर, भारतीयांवर व जगांतील इतर जनांवर होतील, यांचें चित्र खचित उभें झालें असेल. निरनिराळ्या धर्मांच्या इतिहासाचीं पानें त्यांच्या मनःचक्षु समोरून भराभर गेली असतील. **ख्रिश्चन** धर्म, **मुसलमानी** धर्म, **बौद्ध** धर्म आदि प्रमुख धर्म जगांत कां व कसें **उदय** पावले, त्यांचा **प्रसार** कसा झाला, व त्यापैकीं कांहींचा अस्त कां झाला याचें त्यांनीं पुनः पुनः मनन केलें असेल. भारतीय दलितांना व विशेषतः मानीव अस्पृश्य समाजास बौद्ध धर्माच्या आश्रया शिवाय दुसरा कांहीं परिणामकारक मुक्ततेचा मार्ग आहे काय याचाहि पुनः पुनः त्यांनीं पडताळा घेतला असेल; व शेवटी त्यांची सर्व सद् विवेक बुद्धि केंद्रित होऊन, परम निश्चयानें एकमेव सन्मार्ग म्हणून बौद्ध दीक्षा घेण्याचें जाहीर करणाऱ्या निवेदनावर सही केली असेल. मनो विश्लेषणाच्या दृष्टीनें विचार केला तर ता. २३ सप्टेंबर १९५६ चा दिवस डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जीवनातील अभूतपूर्व, हर्षयुक्त व निश्चयाच्या कसोटीला आपण उतरलो याचे अत्यंत उत्कट असें दर्शन घडविणारा ठरला आहे.

## बौद्ध जगतांवरील परिणाम

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या बौद्ध दीक्षा घेण्याचा निवेदनाचा चित्त-वेधक परिणाम निदान भारतीय दलित वर्गांत, व जागतिक बौद्ध जनांत झाला यांत शंकाच नाहीं. बौद्ध जनांनीं **ब्रह्मदेश, सीलोन, जपान, नेपाळ** आदि देशांमधून या निवेदनाचें अत्यंत हर्षानें स्वागत केलें. बौद्ध दीक्षा विधी संबंधी, अखिल बौद्ध जगतांतील जे संदेश आलेले आहेत त्यावरून ती गोष्ट बिलकूल स्पष्ट होते. आलेल्या संदेशापैकीं, कांहीं संदेश इतरत्र नमुन्यादाखल दिलेले आहेत. सर्व संदेश देणें जवळ जवळ अशक्य प्राय आहे. या संदेशा शिवाय बौद्ध जनांनीं सदर दीक्षा विधीबाबात जो बंधुभाव व्यक्त केला तो कृतीत दिसून आला. ब्रह्मदेशाचें, पूज्य भिख्खु **चंद्रमणी महास्थविर** हे ८० वर्षाचें! भारतांतील सर्वांत वृद्ध भिख्खु ! परंतु त्यांनी आपल्या प्रकृतिमानाकडे न पहातां डॉ. **बाबासाहेब आंबेडकरांना** बौद्ध दीक्षा देण्यासाठीं स्वतः येण्याचें मान्य केले, व ते आले हि. त्यांच्या हस्तेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. माईसाहेब आंबेडकर यांचा बौद्ध-दीक्षा विधी पार पडला, या शिवाय, खालील बौद्ध भिख्खु सदर समारंभास होते.

१) **थेरो पन्नातिस्स** सांची विहार. (भोपाळ, )

२) **व्हेनरबल** भिख्खु, एच. **सिद्धतिस्स** सिलोन;

३) **व्हेनरेबल, एम. सौघरत्तना,** सारनाथ (बनारस)

४) भिख्खु जी. प्रज्ञानंद बुद्ध विहार ( लखनौ )

५) [illegible] **श्रमनेर,, धम्मोदय विहार** (पश्चिम बंगाल)

६) **रिव्हीरंडे परमसंधी.**

## पांच कोट बौद्ध

एवढें भिख्खु निरनिराळ्या देशांतून व विभागांतून आले ही सामान्य घटना नव्हे. बौद्ध जगताला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या बौद्ध दीक्षेबद्दल आकर्षण वाटणें दोन दृष्टींनीं स्वाभाविक आहे. एक कारण हें कीं, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा दीक्षा—विधी; म्हणजे मोजून गणित केल्या प्रमाणें भारतांतील सुमारें पांच कोट अस्पृश्य बांधवाचांच दीक्षा विधी होय हे त्यांच्या (**डॉ. बाबासाहेबांच्या**) मागें असलेल्या अनुयायांच्या संख्येवरून व अनुयायांच्या निष्ठेवरून मानावयास मुळींच हरकत नाहीं हे त्यांनीं ओळखलें. भारतामध्यें प्रथम दृढमूल झालेला पण आज बिलकूल सुकून गेलेली बौद्ध धर्माची पाळेंमुळें पुनःश्च टवटवीत कशानें होणार असतील तर

( पान ३८ पहा )

# चालूं युगांतील बुद्ध

(पान ३० वरून)

भारतांतील दरेक खेड्यांत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचें जे असंख्य अनुयायी आहेत, त्यांच्या दीक्षा-विधीनें व निष्ठेनेंच होतील, हें आतां बौद्ध जनास चांगलेच कळून चुकले आहे. तेव्हां या दृष्टीनें बौद्ध जगताला, डॉ. बाबासाहेबांच्या बौद्ध दीक्षेबद्दल आकर्षण वाटणें स्वाभिक होते.

## मूर्तिमंत प्रज्ञा मिळाली

परंतु, याहिपेक्षा दुसऱ्या दृष्टीचें आकर्षण त्यांना अधिक होते, असें म्हणावयास हरकत नाहीं, बौद्ध धर्मामध्ये **प्रज्ञेचें** स्थान सर्वश्रेष्ट आहे. **शांतता, न्याय** व **प्रज्ञा** असा क्रम बौद्ध धर्माच्या शिकवणुकीचा आहे. बुद्ध म्हणजे प्रज्ञावंत. आणि प्रज्ञा म्हणजे ज्ञान संपन्न व जीवन विन्मुक्त ! डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अलौकिक बुद्धिमतेकडे सहज दृष्टी टाकली तरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणजे मूर्तिमंत प्रज्ञाच आहे असें म्हणण्यात कांहीं अतिशयोक्तिची चूक होईल असें वाटत नाहीं. अशी प्रज्ञामय व्यक्ति लाभणें अत्यंत दुर्मिळ असतें. लक्षावधी नव्हे क्रोडो रुपये देखील खर्ची घालून अशा व्यक्तिचें सार्धेमत अगर पाठींबा मिळविणें कठीण असतें. ज्ञान ही अपूर्व मोलाची चीज आहे. अणुशास्त्राचें ज्ञान गुपितपणानें फोडण्याचें प्रकार आतां सर्वांना माहित झाले आहेत. त्यासाठीं, केवढें पहारे ठेवले जातात, परराष्ट्रीय वकालतीत मसलती होतात, आणि गुप्तपणें असे ज्ञानी लोक 'पळवून' नेण्यासाठीं केवढा अमाप पैसा खर्च केला जातो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचें ज्ञान अतुलनीय आहे. त्यांचें धर्म विषयक ज्ञान म्हणजे, मनाच्या सूक्ष्म रचनेचे व मनुष्यत्व पूर्वत्वास नेण्यासाठीं मन सुसंस्कृत बनविण्याचे ज्ञान आहे. जगांतील कोणत्याही धर्माच्या प्रसारकापेक्षां सरस ठरूं शकेल असें त्यांचें ज्ञान आहे. तेव्हां डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं, बौद्ध जगताला पाठिंबा दिलेला आहे एवढेंच नव्हे तर आपले ज्ञान बौद्ध धर्मासाठीं अर्पण करुन बौद्ध धर्माचें ते जवळ जवळ एकमेव पुरस्कर्ते बनले आहेत. नव्हे ते चालू युगांतील ते भारतीय बुद्धच होत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या बौद्ध दीक्षेमुळें बौद्ध जगास, अपूर्व ज्ञानाचा पुरस्कार्ता अत्यंत निकडीच्या वेळी प्राप्त झाला या दुसऱ्याहि दृष्टीनें अखिल बौद्धजनांना डॉ. बाबासाहेबांचं वरील निवेदन परम हर्ष होणें स्वाभाविक आहे.



## दलितांचे गॅझेट 'प्रबुद्ध भारत'

भारतांतील दलित जनतेची प्रतिक्रिया अपरिमित आनंदाची होती. विशेषत: **नागपूर ते मुंबई** या दोन शहरांत व त्या दरम्यानच्या प्रदेशांत उत्साहाची प्रचंड लाटच उसळल्याप्रमाणें झालें. **'प्रबुद्ध भारत'** हें दलित जगताचें जणूं कांहीं अधिकृत असें गॅझेटच आहे. त्यामध्यें ता. २९-९-५६ व १२-१०-५६ च्या अंकांत लागोपाठ **बौद्ध दीक्षा** विधीची बातमी दलित जनतेच्या झोपड्या झोपड्यांतून पोंहोंचविण्यांण्य आली. नागपूर भागांतील **'सिध्दार्थ' 'धर्मदीप' 'धर्मदूत' 'बोधीसत्व'** याही प्रसंगानुरूप प्रसिद्ध होत असलेल्या साप्तहिकांनी मध्यप्रदेशांतील विभागांत सदर माहिती प्रसृत केली. **नागपूर** शाखेच्या **भारतीय बौद्धजन महासभेच्या** समितीनें छापील प्रात्रिके काढून, सर्व दलित बांधवास, बौद्ध दीक्षा विधीच्या कार्यक्रमाबद्दल तपशालवार माहिती दिली.

## कार्यक्रमाचा तपशील

समितीच्या पहिल्या छापील प्रत्रिकेंत स्वागत समितीचे अध्यक्ष, **श्री. रेवाराम कवाडे** व **श्री. वा. मो. गोडबोले** यांनी खालील कार्यक्रम जाहीर केला.

(पान ३२ पहा)

# डोळ्यांतून अश्रू आले

( पान ३१ वरून )

## सामुदायिक धर्मांतर
### कार्यक्रम पत्रिका

शनिवार ता. १३-१०-५६ रोजीं सायंकाळीं ५ ते ८ व परित्राण.

„ ८ ते १० महाबोधी सोसायटीचें जनरल सेक्रेटरी श्री. डीं. बालीसिन्हा यांचे भाषण; आणि भगवान् बुद्धाचें चरित्र व भारतांतील प्रसिद्ध बौद्ध स्थळें यांवर मॅजिक लॅन्टर्न शो.

रविवार ता.१४-१०-५६
( अ शो का वि ज या द श मी )

सकाळी ८ ते ११ **परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर** व सौ माईसाहेब आंबेडकर आणि इतर दीक्षार्थींची **पूज्य भिक्षू चंद्रमणी महास्थविर** यांच्या हस्तें बौद्धधर्मदीक्षा.

सकाळी ११ ते ११:२५ महाबोधी सोसायटी, कलकत्ता, तर्फे परमपूज्य डॉ. बाबासाहेब यांना भगवान् बुद्धांची प्रतिमा भेट.

सायंकाळी ६ ते ७ महाबोधी सोसायटींचें जनरल सेक्रेटरी श्री. डी. वलिसिन्हा यांचें भाषण.

सायंकाळी ८ ते ११ बोधिमंडळ, मिलिंद महाविद्यालय, औरंगाबाद यांचा "युगयात्रा" या मराठी नाटकाचा प्रयोग.

सोमवार ता. १५-१०-५६

सकाळी ८ ते ११ परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जाहीर भाषण.

सांयंकाळी ८ ते १० मॅजिक लॅन्टर्न शो.

याशिवाय स्वागत समितीनें इंग्रजी भाषेत एक प्रत्रिका प्रसिद्ध केलेली होती. त्यानंतर स्वागत समितीनें प्रसिद्ध केलेली तिसरी प्रत्रिका ता.- १३-१०-५३ च्या '**प्रबुद्ध भारत**' च्या अंकात खास पुरवणी म्हणून प्रसिद्ध केलेलीच आहे. एवढ्या साधनानिशी बौद्ध दीक्षा विधी समारंभाची समयोचित माहिती भारतांतील दलित वर्गांना व इतरांना देण्यांत आली.

ही माहीती प्रसिद्ध झाल्या झाल्या ज्यांना ज्यांना या बौद्ध दीक्षा विधीसमारंभास जावयाचे होते, त्यांनी आपपल्या परी, तयारी केली. रेल्वेमध्यें काम करण्याऱ्या दलित बांधवानी तर आपले रेल्वे सवलतीचे पास मुक्रर करून टाकले. भारतीय बौद्ध महासभेचे चिटणीस, श्री. **सवादकर** श्री. **कबीर** व श्री. **गायकवाड** यांनी पत्रकें काढून, ज्याना नागपुरास यावयाची आहे त्यांच्या जाण्यायेण्याची रेल्वेची सवलतीची तिकीटे त्यांनी नांवे नोंदविल्यास मिळवून देण्याची व्यवस्था केली जाईल असें जाहीर केले. मुंबई प्रदेश दलित फेडरेशननेहि अशीच व्यवस्था करण्याचें आश्वासन दिले. या संयुक्त प्रयत्नामुळें, मुंबईहून एक खास रेल्वेची गाडी ता. १३-१०-५६ रोजी बौद्ध दीक्षा विधीच्या आदले दिवशी रात्री सोडण्यांत आली. खास गाडी, फुल्ल भरून गेली होतीं. नाशिहून श्री. **दादासाहेब गायकवाड** व मुंबईहून श्री. **आर. डी. भंडारे** हे या समारंभाच्या आधीच दोन दिवस नागपूरांत व्यवस्थे करितां आधी जाऊन पोहोंचलें होते, ता. १३-१०५६ या दिवशीच्या रात्रीच्या **नागपूर-एक्सप्रेसने** पुण्याहून आलेले, श्री. **शंकरराव खरात वकील**, कर्नाटकांतून आलेले कर्नाटक प्रदेश शे. का. फचे अध्यक्ष श्री. डी. ए. **कट्टी**, मुंबईहून, सिद्धार्थ कॉलेजचे रजिस्ट्रार श्री. **तळवटकर** व श्री. **बी. सी. कांबळे** हे निघाले. त्यांना योगायोगानें त्याच गाडीत, नगरहून आलेले श्री. **डी. टी. रुपवते**, वकील, नासिकचे, श्री. **ए. जी. पवार** वकील, भेटले. 'नवयु'गनें मुद्दाम पाठविलेले खास प्रतिनिधी याच गाडीनें आले. खास सुटलेल्या रेल्वे गाडीनें मुंबई प्रदेश दलित फेडरेशनचें ज. सेक्रेटरी श्री. व्ही. एस. पगारे, श्रीं. दहिविलकर बुवा, श्री. आर. जी. खरात, याशिवाय मुंबईहून वॉर्ड कमिट्यांचें असंख्य कार्यकर्ते होतें. सर्वांचा निर्देश या ठिकाणीं करणें अक्षरशः अशक्य प्राय आहे. एवढी ती प्रचंड गर्दी होतीं.

प्रवासांत, गाडीमधून ही दीक्षार्थी मंडळी, "**बाबासाहेब कर पुकार बौद्ध धर्म को करो स्वीकार**" "**भगवान बुद्ध की जय**" "**डॉ. बाबासाहेब आंबेडकर की जय**" या व अशा घोषणा वारंवार घेत होती. ठिकठिकाणचीं रेल्वे स्टेशनें या सामुदायिक घोषणानी दुमदुमून गेली होती. मुंबई ते नागपूर जणूं अहोरात्र, जागृत जनताच चाललेली आहे असें ते अपूर्व दृश्य होते. या मंडळीत भागिनी—माताची संख्याही जवळ जवळ ३/४ होती. नागपूर रेल्वे स्टेशनवर ता. १३ व १४ आक्टोबर १९५६ रोजी येणाऱ्या रेल्वेच्या गाड्या सर्व बौद्ध दीक्षा घेऊ इच्छिणारांनींच गच्च भरुन येत होत्या.

( पान ३३ पहा )

# स्वतंत्र बाण्याचा मार्ग

( पान ३२ वरुन )

## १४ एकरांचें मैदान

नागपूर शहराच्या दक्षिणेस जवळ जवळ शहराच्या बाहेर **अंबाझरी** नांवाचा रोड आहे. या रोडला लागून असलेलें सुमारें १४ एकर क्षेत्राचें वीस्तीर्ण मैदान बौद्ध दीक्षा विधीसाठीं मुक्रर करण्यांत आले होतें. या मैदानास सभोंवार तट्टे मारले होते. सर्व मैदानाच्या सभोंवार सुमारें २००० ते ३००० विद्युत् दीपांची ( बल्ब्स ) व्यवस्था केली होती. स्त्रीयांसाठीं अर्ध्या भागांत स्वतंत्र व्यवस्था एका छोट्या मंडपासह केलेली होती. पुरुषा करितां राहिलले सर्व मैदान होतें. एरवी तसा नागपुरचा अंबाझरी रोड ओसाडच असतो. पण, सदर समारंभामुळें, रोडवर निरनिराळ्या प्रकारची दुकानेंच स्थापन झाल्याचे दिसून आलें. लाल हाफ शर्टस घातलेल्या नागपुरच्या समता सैनिक दलानें मैदानापासून अलिकडे चार फर्लांग एवढ्यावर अंबाझरी रोडचा बंदोबस्त ठेवला होता. मुंबईचें समता सैनिक दलहि, मैदानांतील समुदायाची व्यवस्था ठेवित होते. एवढी प्रचंड गर्दी पण, मध्य प्रदेशाचें पोलीस क्वचित् कोठें तुरळक १०।१ पहात्रयास मिळालें. बाकी, शांतता व सुव्यवस्था स्वयंसेवकांनींच ठेवली होती. व्यासपीठ, व दीक्षाविधीचें समग्र वर्णन इतरत्र दिलेलें आहे, त्यामुळें त्याची पुनरावृत्ती यामध्यें करण्याचें कारण नाहीं.

## नागपूरांतील धमाल

नागपूर शहर ता. १४ ला तीनलाच जागे झाले असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुमारें ४ लाख लोक तरी, नागपूर बाहेरुन आलेले होते. त्यांची व्यवस्था, नागपूर शहरांतील जेवढ्या शाळा हायस्कुल आहेत, त्यांच्या इमारतीत [सुटीत रिकाम्या असल्यानें] करण्यांत आली. या संस्थाच्या चालकांचें आभार मानावें तेवढें थोडेच आहेत. परंतु, एवढया प्रचंड लोकसंख्येस, शाळा हायस्कूच्या इमारती कितीशा पुरेशा पडणार? पहाटे ३ पासूनच मिरवणुकांना व घोषणांना सुरवात होऊन, नागपूर जागे झालें. अंबाझरी रोडला एकच एक गर्दी सकाळपासून लोटली होती. खुद्द नागपूरकरच असे म्हणत होते कीं, या प्रकारचा लोक समुदाय व उत्साह आजपर्यंत नागपूरांत इतर कोणत्याही समारंभांत दिसून आला नाहीं. नागपूरच्या स्थानिक वृत्तपत्रांनीं त्याप्रमाणें बातम्याहि दिल्या. त्याचे दोन नमुने या अकांत इतरत्र दिलेलेच आहेत. एवढ्या प्रचंड गर्दीचा परिणाम व्यापारी नागपुरावर झाला. रिक्षा, जेवण, यांचें दर दुप्पट वाढण्यातही दोन दिवसांत घडून आला. या समारंभाची व्यवस्था व जबाबदारी **भारतीय बौद्ध महासभा**, नागपूर शाखेनें घेतली होती; व प्रामुख्यानें ती जबाबदारी श्री. **कवाडे**, श्री. **गोडबोले**, श्री. **पंचभाई**, आदिनी पार पाडली त्याबद्दल त्यांना धन्यवाद देणें उचितच होईल.

## हृदय भेदक प्रसंग

ता. १४ आक्टोंबर रोजींच्या बौद्ध दीक्षा घेण्याचा विधीतील सर्वांत अगदी हृदयास भिडणारा परमोच्च प्रसंग नमुद केला पाहिजे. तो प्रसंग हा कीं, ज्या वेळीं, डॉ. बाबासहिब आंबेडकर **मनुष्य मात्रास नीच** मानणाऱ्या **हिंदु धर्माचा मी त्याग करतो** असे म्हणाले, तेव्हां त्यांचा गळा दाटून आला व त्यांच्या डोळ्यांत अश्रू चमकले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना कोणते दुखः झाले असले पहिजे? त्यांच्या सारख्या असामान्य निश्चयाच्या या महा पुरुषाच्या नेत्रांतून अश्रू कां यावें ? डॉ. बाबासाहेबांना असें वाटलें असण्याचा संभव आहे कीं, मी ज्ञान मिळविण्याची परकाष्टा केली, उत्कृष्ट चारित्र्य ठेवले, वैयक्तिक लाभाची पर्वा केली नाहीं, अनेक ग्रंथ लिहून भारताच्या '**विचारात**' भर घातली, श्रीदानें जीवन घालविले, म्हणजे, ज्ञान, शील व सचोटी या बाबतींत मी कोणा पेक्षां कमी नसता व गेली ३० वर्षे हिंदु धर्म समाज रचनेत राहिलो, पण केवळ, माझ्या दलित बांधवांना इज्जतीचा व स्वतंत्र बाण्याचा मार्ग दाखवितो म्हणून हिंदुंनी कोणत्या प्रकारच्या कारवाया करून माझे मार्ग बंद करण्याचें कार्य अव्याहतपणें त्यांनीं ठेवले? त्यांना याबाबत साध्या माणुसकीची सुद्धां आठवण राहिलेली नाहीं. तेव्हां, मी व माझ्या बांधवांनीं असें कोणते पाप केलें कीं, त्यांच्यामध्यें राहूनहि त्यांनी आम्हास साध्या माणुसकीनें आम्हास राहूं देत नाहींत. कांहींहीं असो या अतिशय बिकट परिस्थितींतून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं जो मार्ग आतां आपल्या दलित बांधवांना दाखविला, तो पूर्ण '**स्वतंत्र**' बाण्याचा सर्वोत्कृष्ट आहे यांत शंकाच नाहीं.



( पान ३४ पहा )

— आंबेडकर बौद्ध दीक्षा विशेषांक —

# विश्व कर्ता कोण?

( पान ३३ वरून )

## नवयुग प्रतिनिधीशी संवाद.

संध्याकाळी, डॉक्टर साहेबांना भेटण्यासाठी 'नवयुग' साताहिकाचे प्रतिनिधी येऊन भेटले. तेव्हां खालील संवाद घडून आला.

**डॉक्टर साहेबः**– कधीं आला!

**नवयुग प्रतिनिधीः**– सकाळी

**डाक्टर साहेबः**– किती लोकं आज हजर होते असे तुम्हाला वाटते?

**नवयुग प्रतिनिधीः**– ४ ते ५ लाख तर होतेच.

**नवयुग प्रतिनिधीः**– आम्ही प्रश्न विचारण्याच्या इरादानें आलो नाहीं. आपला कांहीं संदेश असल्यास त्यासाठीं, आम्ही आलो आहे.

**डॉक्टर साहेबः**– संदेश काय देऊ? आणि कोणता देऊ?

**नवयुग प्रतिनिधीः**– आजच्या सारख्या प्रसंगामुळें ऑरथॉडॉक्स (सनातनी) हिंदुच्या मनावरील परिणाम कमी होईल.

**नवयुग प्रतिनिधीः**– बुद्धिझमचे मेटॅफिजिक्स कोणते?

**डॉक्टर साहेबः**– आम्हाला मेटॅफिजिक्स कशाला पाहिजे?

**नवयुग प्रतिनिधीः**– म्हणजे देव, पुनर्जन्म, कर्म वगैरे कल्पना बाबत आधुनिक परिस्थीतीत कोण कोणत्या कॉंट्रॅडिक्शन्स (विरोध) दिसून येतील?

**डॉक्टर साहेबः**– अहो तुमच्या आधुनिक परिस्थितीच्या कल्पना काय आहेत? आमचे असें आहे कीं, भगवान बुद्धानें जे कॉंट्रॅडिक्ट केलें ते आम्ही कॉंट्रॅडिक्ट करणारच! कर्म' म्हणजे काय हे तुम्हीं माझे पुस्तक प्रसिद्ध होईल ते ३२ रुपयास विकत घेऊन वाचा म्हणजे कळेल. भगवान बुध्दानीं सांगितले आहे कीं, देव नाहीं. कारण आमच्या भाकऱ्या भाजण्यास कांहीं देव येत नाहीं. यानंतर डॉक्टर साहेबांचे स्पष्टीकरण बरेच रंगांत आले, व ते पुढें म्हणालेः

"विश्व कसे निर्माण झाले याच्या कोड्यावर देवाचं आस्तित्व अवलंबून आहे. विश्वांत चंद्र, तारे, पृथ्वी, मानव कोणी निर्माण केले असा प्रश्न केला जातो. आणि त्या प्रश्नाला धरून असें कांहींजण सांगतात कीं, याचा कर्ता सवरता देवच असला पाहिजे.

यानंतर थोडा वेळ थांबून डॉक्टरसाहेब म्हणाले, "या बाबत आमच्या भगवान बुद्धाचें काय म्हणणे आहे हे तुम्हास माहित आहे काय? भगवंताच्या म्हणण्याप्रमाणें विश्वाच्या उत्पत्तीचें दोन अर्थ आहेत. एक अर्थ हा कीं, विश्व हे शून्यांतून निर्माण झालें. शून्यांतून विश्व उत्पन्न होणें शक्य नाहीं. अगर दुसरा अर्थ, हा कीं, आधींच विश्वामध्यें कांहींतरी मुळांतच उत्पन्न झालेलें होते. आणि जर मुळांतच कांहीं उत्पन्न झाले असेल, तर मग देवानें तें उत्पन्न केले असें कसें म्हणता येईल?

भगवान बुद्धाची विचारसरणी अशी शास्त्रोक्त व तर्कशुद्ध आहे. त्या भगवंताच्या मार्गानें आम्ही जात आहोत"

यानंतर इतर कांहीं चर्चा झाली. दुसरें दिवशीं ता. १६-१०-१९५६ रोजी सकाळीं बाबासाहेब आंबेडकर हे **चांदा** येथें गेलें. तेथेंही सुमारें एक लाख समुदाय हजर होता. त्या समुदायास डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं बौद्ध धर्म दीक्षा दीली. बॅ. खोब्रागडे व इतर दलित फेडरेशनचें पदाधिकारी या प्रसंगीं हजर होते. चांद्याहून डॉक्टरसाहेब नागपूरास परत आले; आणि नागपुरांतून त्यांनीं व सौ माईसाहेब आंबेडकर यांनीं विमानानें दिल्लीस प्रयाण केलें. बौद्ध दीक्षा विधी निमित्तानें घडून आलेला सोहळा अशा तऱ्हेनें समाप्त झाला.

—x०x—

( पान ७ वरून )

श्री. सी. एन. मोहिते, श्री. गो. ति. परमार ( गुजराथशाखेचें अध्यक्ष ) श्री. वा. कां. परमार, श्री. डी. जी. जाधव. सौ. सरोजिनी जाधव, पुण्याचे श्री. वि. रा. रणपिसे, श्री. ससालेकर श्री. हरिदास आवळे, श्री. फुलझेले श्री. अहोटे, श्री. व्ही. एस. पगारे, श्री. उपशाम, श्री. बी. एम. मोरे, श्री. बी. एच. वराळे, धोंडीराम पगारे, श्री. यशवंतराव आंबेडकर ( बाबासाहेबांचें पुत्र ) श्री. मुकुंदराव आंबेडकर आणि श्री. बी. सी. कांबळ वगैरे.

याच वेळी न्या. भवानीशंकर नियोगी, श्री. कुळकर्णी, ( बुद्ध समितीचे चिटणीस ) औरंगाबादच्या मिलिंद कॉलेजचें प्रिन्सिपाल श्री. एम. व्ही. चिटणीस श्री. बी. एस. कबीर आदि सवर्ण हिंदुनीही बौद्ध धर्माची दीक्षा घेतली.

सकाळचा हा कार्यक्रम ११ बाजेपर्यंत चालू होता. नंतर रात्री औरंगाबादच्या मिलिंद महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांनी 'युगयात्रा' या नाटकाचा चांगला प्रयोग करून दाखविला. त्यावेळी सौ. माईसाहेब आंबेडकर उपस्थित होत्या.

—x०x—

# सद्धतिसांचें भाषण

**नागपूर येथें ता. १४-१०-१९५६ रोजी, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दीक्षा घेतली तेव्हां, इतर भिख्खु समवेत सीलोनचे भिख्खु सद्धतिसा हेंही हजर होतें. त्यांना या बौद्ध दीक्षा विधी बाबत उत्कटपणें आकर्षण वाटले. दीक्षा विधी समारंभ झाल्यानंतर दुसरे दिवशी ता. १५-१०-१९५६ रोजी सकाळी, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचें जाहीर भाषण होतें. त्यापूर्वी, भिख्खु सध्दतिसांनीं एक छोटें भाषण केलें. त्या भाषणांत, बौध्द भिख्खुंच्या व अखिल बौध्द जनांच्या भावना व्यक्त झालेल्या आहे. त्यांचें भाषण खाली दिलेलें आहे.**

" माझ्या स्मरणा प्रमाणें सुमारे १९३६ च्या आसपास दलितावर लादला गेलेल्या हिंदु धर्माचा त्याग करण्याची घोषणा डॉ. **बाबासाहेब** आंबेडकर यांनी केली. दलितांवर हजारो वर्षे अन्याय झाला आहे. यामुळें या श्रेष्ट दर्जाच्या नेत्यानें भारतीय संस्कृतीच्या व धर्मांच्या संशोधनासाठी अखंड अभ्यास केला. त्या संशोधनांती, त्यांना हें दिसून आलें कीं, ज्ञान प्रकाशासाठीं, परदेशांतील धर्माकडे धांवण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. **भगवान बुद्धाची** शिकवण त्यांनीं आत्मासात केली, आणि, पीडलेल्या दलितांसाठीं त्यांनी अखेर यथायोग्य तऱ्हेनें बौद्ध धर्माचीच निवड केली.

## धर्मांतर नव्हे, स्वधर्म स्वीकार

या समारंभाला कांहीजण कन्व्हर्शन (धर्मांतर) समारंभ म्हणतात. हें वर्णन तितकेसें आनंद दायक नाहीं. खऱ्या अर्थानें पाहिलें तर हे **स्व-धर्मांतर** आहे; स्वतःहून केलेले धर्मांतर आहे. धर्मांतर हा शब्द ज्या रूढ अर्थानें वापरला जातो, त्या अर्थानें त्यांत आमिश्र असते, आणि परधर्मांत गेल्याची भावना असते. आपल्या स्वधर्मांतरामध्यें तसें नसून आपल्या देशाच्या पूर्वीच्या धर्मांत आपण जात आहोत. **भगवान बुद्ध** भारतांत जन्मले. या भूमिवरच त्यांना **निर्वाण** प्राप्त झाले. तेव्हां भारतीय पुत्रांनीं व त्यानी बौद्ध धर्म स्वीकारला तर रूढ **अर्थानें** म्हणतात तसें त्यांनीं धर्मांतर केलें नसून, त्यांनीं स्वधर्म पत्करला असेंच म्हणावयास पाहिजे.

भगवन्ताच्या महानिर्वाणाचें २५०० वें वर्ष आपण नुकतेंच साजरे केलें. भगवान बुद्धाच्या भारत भूमिंत आतां आपण त्या २५०० व्या वर्ष समारंभाचें निव्वळ 'उघे' राहिलेलो नाहीं, ही समाधानाची गोष्ट आहे.

## अखिल भारतास दाखविलेला मार्ग

**भगवंताच्या** महानिर्वाणाचें २५०० वें वर्ष साजरें करण्याचें त्याची शिकवण आचरणांत आणण्याचें अनेक मार्ग आहेत. त्यांतील सर्वोत्कृष्ट मार्ग कोणता? भगवंताची शिकवण कशी आचरणांत आणावी या बद्दल आपला प्रमुख शिष्य **आनंद** याजबरोबर संवाद करीत असतां खुद्द भगवंतानीच मार्गदर्शन केलेलें आहे. **भगवंत** म्हणतातः— "**आनंद**, जो कोणीं धर्म पाळतो, दीक्षा घेतो, व तथागतानें घालून दिलेल्या नियमानें वागतो तोच खरें धर्माचरण करतो." २५०० वें वर्ष केवळ साजरें करण्यांत कांहींना कांहीं अर्थ आहे; परंतु, खरी क्रिया म्हणजे भगवान बुद्धाच्या धर्माची दीक्षा घेण्याची आहे. डॉ. **बाबासाहेब आंबेडकर** यांनीं अशा तऱ्हेनें भगवंतांनीं सांगितलेल्या सराखुरा मार्ग बौद्ध दीक्षा घेऊन अनुसरला आहे. बाबासाहेबांच्या या निर्णयानें केवळ त्यांच्याच अनुयायांना त्यांनीं मार्ग दर्शन केले आहे, असें नव्हे तर भारतांतील अखिल जनतेस त्यांनीं सद्धर्माचा मार्ग सांगितला आहे.

भगवन्ताच्या महान् शिकवणुकी मुळेंच एके काळीं भारतानें सद्धर्म मानव जातीला देण्यांत, एक प्रकारे **धर्म विजय** प्राप्त करून घेतला होता. पुनः एकदा अखिल भारतीय लोक, त्यांच्या स्वतः च्या कल्याणासाठीं त्याच प्रमाणें जगाच्या कल्याणासाठीं भगवन्ताच्या धर्म-निशाणाखालीं येवोत, अशी मी प्रार्थना करतों. डॉ. बाबासाहेब आंबेडकर व त्यांचे लाखो अनुयायी यांनी बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन भारतीय धर्माच्या इतिहास हें जे नवीन सुवर्ण पान उघडले आहे त्याचे सर्व भारतीयांनीं मनन करावें.

—×०×—

# बौध्द दीक्षेचें मर्म

सुमारें अडीच हजार वर्षानंतर दि. १४ आक्टोबर १९५६ रोजीं नागपूर मुक्कामी जे धर्मचक्र फिरविलें गेलें, त्याचा सुपरिणाम भारतीयांवर कसा काय होईल याचा काळच निवाडा देईल. तथापि मनुष्य मात्राच्या विचारशक्तीला आकलन करतां येईल; तेवढया शक्तीच्या जोरावर आम्ही असें निक्षून सांगू इच्छितों कीं, या धर्म प्रवर्तनानें या देशामध्यें मनुष्य मात्राच्या मानखंडनेचा जो हीनप्रचार धर्माच्या नांवाखालीं आजवर सर्रासपणें चालू होता, तो यापुढें पार नाहींसा होईल.

## पूर्वीचा कित्ता

जो समाज आजपर्यंत सवर्ण हिंदूंनीं धर्माच्या नांवाखालीं घालून दिलेल्या नीतीबंधनामुळें आचार, विचार व उच्चार स्वातंत्र्याला पारखा झाला होता. ज्या समाजाला उघड्या शिरानें फिरण्याची सक्त मनाई होती, ज्याला वस्त्रालंकार परिधान करण्याची मनाई होती, इतकेंच काय परंतु ज्याला समानतेनें वागविण्यास जो धर्म तयार नव्हता, ज्याला ज्ञानार्जनापासून परावृत्त करून अज्ञानांधकाराच्या खाईत दूर लोटून देण्यांत आलें होतें. मनुष्य मात्राला जीवंत व जागृत ठेवणारी शक्ति ज्या धर्मानें या मानीव अस्पृश्य समाजापासून दूर हिरावून त्यांना ओझ्याचें बैल करून ठेवलें होतें. ज्यांना साधें माणुसकीचेंहि हक्क दिलें जात नव्हते अशा अस्पृश्य समाजाला ज्ञानामृत पाजून डॉ. बाबासाहेबांनीं त्यांना माणसांत आणलें, व त्यांना सवर्ण हिंदूंनीं आपल्यांत, व त्यांना आपलेंच भाईबंद समजून त्यांना समानतेनें वागवावें. म्हणून गेली चाळीस वर्षे प्रयत्न केले. आणि त्यांच्याशी निकराचा लढा दिला. 'आम्ही देखील तुमच्या सारखीच माणसें असतांना तुम्ही आम्हाला हीन लेखूं नका' अशी गंभीर स्वरानें ज्यानें हिंदू समाजाला हांक मारली त्यांच्या हांकेकडे या सनातनी समाजानें पाठ फिरविली! नाहीं म्हणावयाला वरकरणी देखाव मात्र घडूं लागलें. जगाला

: लखक :
**मुकुंदराव आंबेडकर**

भुरळ व भुलवणारी दृश्यें निरनिराळया प्रसंगीं घडवून आणण्यांत आली. मात्र ह्या नयनरम्यते (!) नंतर मात्र ते पूर्वीचाच कित्ता गिरवूं लागले.

बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यानेंच या वंचित समाजाला समानता लाभून त्यांच्यामध्यें विश्व बंधुत्वाचें नातें निर्माण होईल, आणि त्यांना माणुसकीचें हक्क प्राप्त होतील.

## धर्म परिवर्तनानेंच हृदय परिवर्तन होईल

अस्पृश्यता नष्ट करण्याचें एकमेव साधन म्हणजे '**धर्म परिवर्तन**' नसून '**हृदय परिवर्तन**' होय असें कित्येक विद्वानांचे (!) मत आहे. आणि हेंच जर एक साधन असते असें जर गृहीत धरलें तर सुवर्ण हिंदुच्या या हृदय परिवर्तनासाठीं कां थोडथोडके प्रयत्न झाले? त्यांचें हृदय परिवर्तन व्हावें व त्यांच्यामध्यें सद्भावना निर्माण होऊन त्यांनीं या आपल्या वंचित बंधूंस मिठी मारावी त्यांना आपल्यांत सामावून घ्यावें यासाठीं गेल्या चाळीस वर्षांत ज्यांनीं हृदय परितर्तनाची आवश्यकता नसून धर्म परिवर्तनाची आज खरी निकड आहे अशी त्यांची मनोमन खात्री झाली व त्यांच्या अनुयायांना त्यादृष्टीनें आदेश दिला. याबाबतींत त्यांच्या अनुयायांचें तरी दुमत असूं शकणार नाहीं असें आम्ही छातीठोक म्हणूं शकतों.

## कनिष्ठपणाचें शल्य नष्ट होईल.

नुकतेंच हे जे धर्म परिवर्तन घडून आलें, त्यामुळें अस्पृश्यांचें अंतर्बाह्य स्वरुप बदलेल. आजपर्यंत आपणाला हीन लेखण्यांत आल्यामुळें आपण इतरांहून अधर्दी कनिष्ठ दर्जाचें आहोंत, त्यांची मानखंडना झाल्यामुळें जें शल्य त्यांच्या हृदयाला सारखें टोंचत होतें, व खरेंच आपण साध्या माणुसकीचें हक्क भोगण्यालाहि लायक नाहींत ही भावना या समाजामध्यें पसरली होती तिचें निर्मूलन होऊन त्यांना समानतेनें आपले जीवित व्यक्तित करता येईल. सनातनी हिंदुधर्माच्या अनीतीबंधनाचें पाश तुटल्यामुळें ते मोकळ्या वातावरणांत वाढूं लागतील.

या धर्मांत सारखेपणा असल्यामुळें, श्रेष्ठ—कनिष्ठ असा दुजाभाव नसल्यामुळें त्यांच्यामध्यें हिन गंडाची भावना उत्पन्न होणार नाहीं. आचार विचार व उच्चार स्वातंत्र्य असल्यामुळें स्वतंत्रपणें जीवन जगतां येईल.

## विश्वव्यापी तत्वाचा आस्वाद

थोडक्यांत या धर्मप्रवर्तनानें हा वंचित समाज मनमोकळ्यापणें समानतेनें, विश्वबंधुत्वाचें नातें निर्माण झाल्यामुळें जीवन व्यक्त करील आणि धर्म प्रवर्तनाच्या आदेशामुळें बौद्ध वाङ्मयाचा सर्वांस स्वाद घेतां येईल व त्यांच्या विशाल व विश्वव्यापी तत्वांचा अनुभव घेतां येईल. भगवान बुद्धांनीं आपल्या धर्मांत काळाला योग्य असा बदल घडवून आणण्याचा दिलेला दिव्य संदेश अमुल्य आहे. वा तो सत्यसृष्टींत उतरल्यानें सर्वांच्या दृष्टोत्पतीस येईल.

अडीच हजार वर्षानंतर कां होईना पण हें धर्म प्रवर्तनाचें जें चक्र फिरलें आहे, त्यानें भारताच्या इतिहासाची पानें भरली जातील, व त्याला मानाचें स्थान प्राप्त होईल, हीच एक शुभकामना होय.

—×०×—

## बौद्ध–दीक्षा प्रसंगीं बौद्ध भिख्खुंनीं केलेलें सामुदायिक शुभ–चिंतन.





डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब आंबेडकर यांनीं ता. १४–१०–५६ रोजीं बौद्ध–दीक्षा घेतली त्या प्रसंगीं हजर असलेले बौद्धभिख्खु सामुदायिकरित्या शुभचिंतन करीत आहेत.



## आंबेडकर बौद्ध–दीक्षा विधीस लोटलेला दलित मानवतेचा महासागर !

## भगवान् बुद्धाच्या मूर्तिंचा स्वीकार



**डॉ. बाबासाहेब आंबेडकर व सौ. माईसाहेब आंबेडकर**
यांनीं महाबोधी सोसायटी मार्फत अर्पण केलेल्या बुद्ध-मूर्तींचा साभार स्वीकार केला.

## जाहीर निवेदन

भारतीय बौद्ध महा सभेच्या मुंबईतील व इतर सर्व शाखांना जाहीर करण्यांत येतें कीं, रविवार दि. १४-१०-५६ रोजीं नागपूर मुक्कामी ज्या स्त्री-पुरुषांनीं बौद्ध धर्माची दीक्षा घेतली आहे. त्यांची पूर्ण नांवें, पत्ते, हुद्दा, वय, जात इत्यादि समग्र माहिती भारतीय बौद्ध महा सभा कचेरी (बुद्ध भूषण छापखाना दादर मुंबई १४) येथें आठ दिवसाचें अवधींत न चुकतां कळवावी.

आपले नम्र
का. वि. सवादकर
वा. कृ. कबीर
भ. स. गायकवाड

# बौद्ध दीक्षा विधी समाप्त झाल्यानंतर

डॉ. बाबासाहेब व सौ. माईसाहेब आंबेडकर यांचा बौद्ध दीक्षा विधी संपल्यानंतर गांभीर्यानें, पूज्य चंद्रमणींचे आशिर्वाद घेत आहेत.



## ५ लाख दलितांना बौद्ध दीक्षा



डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे स्वतः नागपूर येथें जमलेल्या ५ लाखाहून अधिक असलेल्या दलित बांधवास बौद्ध दीक्षा देत आहेत.

## अतिशय दुर्मिळ प्रसंगाचें छायाचित्र.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं बौद्ध दीक्षेच्या प्रतिज्ञा घेतल्यानंतर भगवान बुद्धाच्या प्रतिमेस ते मनोभावे अभिवादन करीत आहेत.

**प्रसंग :** ता. १४-१०-१९५६.] [ **वेळ :** सकाळीं १० वाजतां.



★

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीं बौद्ध दीक्षा
ल्यानंतर त्यांना भगवान बुद्धाची प्रतिमा मह
सोसायटी कलकत्ता, तर्फे-अर्पण करण्यांत येत

★

आंबेडकर बौद्ध-दीक्षा विशेषांक

र. नं. बी ४८४७






साप्ताहिकाचे वर्गणीचे दर

वार्षिक ७ रुपये

सहामाही ४ रुपये

व्ही. पी. पद्धत बंद

वर्गणी पाठविण्याचा प

शां. अ. उपशाम

व्यवस्थापक

बुद्ध भूषण प्रिंटिंग प्रे

गोकुळदास पास्ता रो

दादर, मुंबई नं. १४.

वर्ष १ लें ] मुंबई, शनिवार ता. २७ आक्टोबर १९५६ [अंक ३५ व

## ★ जागृत बौद्ध - महिलांचा प्रचंड समुदाय ★

- पुनर्मुद्रण-

प्रदीप गायकवाड

समता प्रकाशन,

समता सैनिक दल,

नवा नकाशा, नागपूर - ४४००१७

सहयोग रु/- २०

धम्मचक्र प्रवर्तन दिवस आक्टो. १९९५

नागपूर येथें ता. १४-१०-१९५६ रोजी या हजारों दलित महिलांनी आपल्या मुलांसह डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या हस्तें बौद्ध दीक्षा घेतली.

मुद्रक व प्रकाशक :- श्री. वाय. बी. आंबेडकर यांनी हा अंक बुद्ध भूषण प्रिंटिंग प्रेस, गोकुळदास पास्ता रोड, दादर, मुं. नं. १४ येथें छापून तेथेंच प्रसिद्ध केला.